रविकिरणमंडळाचें ३८ वें पुस्तक

# चंद्रलेखा

[ 'सुवर्णा' कथा व 'गौळणी' नृत्य यांसह ]

गिरीश

सदस्य रविकिरणमंडळ

प्रथमावृत्ति

रविवार, २८ ऑक्टोबर १९५१

मूल्य सव्वा तीन रुपये

प्र का श क
शंकर केशव कानेटकर
'कांचन.' विश्रामबाग, सांगली



चि त्र का र
भा. ग. उर्फ बाळासाहेब भुरके
'कलाभुवन,' सातारा

मु द्र क
लक्ष्मण बाळकृष्ण शिखरे
नवभारत छापखाना, सांगली

# किरणशलाका

# कृतज्ञता

'चंद्रलेखा' हा माझ्या स्फुट कवितांचा चवथा संग्रह असून तो आज 'रविकिरणमंडळाचें' ३८ वें पुस्तक म्हणून प्रसिद्ध होत आहे. या संग्रहांत १९४२ ते १९५१ मधील निवडके कविता संग्रहित केल्या असून, त्यामधे 'सुवर्णा' ही कथा, 'गौळणी' हें कथानृत्य व 'देऊळ बांधणारास' व 'नागरयोगी' हीं दोन कन्नड कवितांचीं भाषांतरें असें कांही नम्र अभिनव प्रयत्न समाविष्ट केले आहेत, त्यांकडे मी वाचकांचें लक्ष वेधूं इच्छितों. काही कवितांतील संदर्भ कळण्यासाटीं शेवटीं टीपा दिल्या आहेत.

या संग्रहाचे हस्तलिखित माझे विद्यार्थी श्री. माधव जगन्नाथ तांबे यानी तयार केलें; दुसरे एक विद्यार्थी श्री. विनायकराव पाटणकर यानी पुस्तकाला उत्तम कागद मिळवून दिला; 'नवभारत छापखान्याचे' उत्साही व्यवस्थापक श्री. लक्ष्मणराव शिखरे यांनी कोरा टाइप आणविला; श्री. रामचंद्र नवरे, कृष्णाजी पवार व वासुदेव केळकर यांनी खिळेजुळणी, मुद्रण व बांधणी याकडे मनोभावें लक्ष पुरविलें, आणि माझे सातारचे कलावंत मित्र श्री. बाळासाहेब भुरके यांनी दर्शनी सुंदर चित्र काढून तिरंगी मुद्रणाची सजावट केली, या सर्वांच्या आपुलकीमुळें 'चंद्रलेखे' च्या सुबकतेंत निश्चित भर पडलेली आहे. या सर्व मित्रांच्या लोभाबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहें.

'कांचन,' विश्रामबाग
सांगली
१ ऑक्टोबर १९५१

गिरीश

" How many are you," then said I,
If they two are in heaven ? "
Quick was the little Maid's reply,
" O Master ! We are seven. "

- Wordsworth

## रविकिरणमंडळ

( स्थापना १९२३ )

डॉ. माधवराव त्र्यंबक पटवर्धन

सौ. मनोरमाबाई रानडे

प्रा. श्रीधर बाळकृष्ण रानडे

श्री. दत्तात्रय लक्ष्मण गोखले

श्री. विठ्ठल दत्तात्रय घाटे

श्री. गजानन त्र्यंबक माडखोलकर

श्री. यशवंत दिनकर पेंढरकर

प्रा. शंकर केशव कानेटकर

" आम्ही सात मिळून फेर धरितों ध्येयासभोंती असे "

प्रिय सुहृद्

यशवंत दिनकर पेंढरकर

प्रल्हाद केशव अत्रे

नारायण धोंडो ताम्हनकर

यांस

सप्रेम समर्पण

# चन्द्रलेखा

## १. स्वतंत्रते !

[ गज्जलः वृत्त- कलिंदनंदिनी

स्वतंत्रते नमोस्तुते ! नमोस्तुते स्वतंत्रते !
पवित्र घेइं अर्घ्य हे; नमोस्तुते, महात्मते !

अघोर रात्र कंठली घनांधकार सेविला !
सुरम्य आज तेज हें तुझें विशाल फाकतें !
न आग पोटिची कधी, न आग अंतरांतली —
विषण्ण शांतली, तरी विनम्र पूजिलें तुतें !
ज्वलंत ओठ बोलले ! ज्वलंत हात पेटले !
ज्वलंत रक्त सांडलें सुपूजनार्थ, देवते !
तयांत शांतिभाव तूं उदात्त दिव्य दाविला,
प्रसन्न जाहलीस गे ! नमोस्तुते ! नमोस्तुते !

समर्थ लोकमान्य कीं हुतात्म वीर अग्रणी,
खपुष्पमालिका शिरीं वरून वर्षतात ते ?
जवाहिरेंच मध्यरात्र वर्षली तुझ्यावरी,
प्रभातिची प्रसन्नता तरी वरी विराजते ?
सुरत्न शोभयी नव्या मयूर आसनावरी–
बसून येसि, तेज हें तरी तुझें झळाळतें ?
तशांत वाहिलीं कुणीं इथून लाल अंबुजें,
म्हणून दिव्य रक्तिमा ! जयोस्तुते ! नमोस्तुते !

नव्या मनूंतल्या ऋचा विहंग मंजु गुंजती,
सतेज पल्लवांतुनी सताल गीत डोलतें !
करून वायु विंझणें, करून मेघ वर्षणें,
खळाळुनी नदी तुझें नवीन सूक्त बोलते !
" उदंड भद्रलाभ हो गुरुत्वदर्शनीं तुझ्या ! "
सुवर्ण–तेज हें तरी हिमालयीं चकाकतें !
अखंड मायभूध्वजा नवीन मंत्र घोषुनी
तवागमार्थ गर्जते– " जयोस्तुते ! जयोस्तुते ! "

१ ऑगस्ट ४७
विश्रामबाग, सांगली

## २. उन्हाळा !

[ जातिः साकी

करित पुकारा अंमलदारासंगें बेलिफ गेला,
दारीं ठाकुन 'साऱ्या'साठीं सवाल त्याने केला.
कौलारावर कडक तावलें ग्रीष्मामधलें ऊन,
पैशाभावीं आग जनीच्या उफळे पोटांतून !
त्यांत बुडालीं पिकें ! न आला घरांत दाणागोटा !
नवयुद्धाच्या महागाइचा मस्तकिं बसला सोटा !
नातेवाइक कुणि नच आले दावायाला तोंड,
आणि पातली सरकाराची उरावरी ही धोंड !

भाकर करितां उठे जनाई, धावत येई दारीं,
धडकी भरली उरांत बघतां बेलिफ उग्र, करारी.
पोरें येउन घट्ट घालितीं तों कमरेला विळखा,
वात्सल्याने बसे जिवाला एक आणखी चरका !
कठोर वचनीं तोंच मागणी पुन्हा तयाने केली,
आग पेटुनी ज्वाळा त्याची हृदयीं भडकुन गेली !
हाकलुनी तों तिला घरांतुन दीन मुलांसह, त्यानें-
कुलुप ठोकलें घरास, हसुनी छद्मी उन्मादानें !
'लहान बाळें ! वैधव्याने नव यौवन जळलेलें !
दारिद्र्याने असहाय जिवा केलेलें !'— मग दिसलें !
मळयाकडे ती म्हणुन धांवली — जाउन विहिरीपाशीं,
देह झोकुनी, आग हृदयींची विझवी दीन, उपाशी !!

चहा पितांना हंसले इकडे बेलिफ, अंमलदार !
आणि हांसले मित्र गांवचे तरुण कुणी गुलजार ! !

पार न उरला लहानग्यांच्या अघोर आक्रांताला;
आंतुनिवाहेरुनी तयांचा हाय ! उन्हाळा झाला !

२ मे ४२
गदग

# ३. होमकुंड !

[ जाति : भूपतिवैभव

'काड! काड!' पिस्तुल कडाडलें आकाशीं,
जाळांतुन सुटल्या गोळ्या दोन अपेशी!
वेगानें घुसल्या सणाणुनी गर्दीत,
लोळवून तरणे बांड दोन भूमीशीं!

छातींतुन जातां एक रक्तबम्बाळ –
जागेवर पडला किंचाळुन वेल्हाळ!
रक्ताचें थारोळेंच बिछाना झाला!
प्रेतावर उमले रक्तफुलांची माळ!!

दुसऱ्याच्या गेली मांडीमधुनी गोळी!
घायाळ गर्जली तरि त्याची आरोळी!
ही शांतिस्वातंत्र्यास्तव धडपड सारी!
मानवता येउन काय पेटवी होळी?

पहिल्यास पातले उचलायाला लोक;
पितरांचा झाला– हाय! अनावर शोक!
इतरांस न देती स्पर्शूं पिस्तुलवाले,
वीरोचित मरणावरती ठेवुनि रोख.

अन्यास न्यावया हात पुढे तों आले.
बोलला जिवा तों अनंत लागुन भाले –

'मी स्वतंत्र भारतभूमातेचा पूत!
मज शिवूं नका! ते हात भ्रष्ट जहाले!!'

खेचून तयांनी परि दोघांना नेलें!
पहिल्याचें कोठे गुप्त वहनहि केलें!
सकलांचे पडले धुळींत जळते अश्रू!
होमकुंड पेटे त्यानें हळहळलेंलें!!

त्यांतून निखारे फुलले; फुलली आग!
भडकल्या तियेच्या ज्वाळा जागोजाग!
भाजून निघालीं आणि तयांनी रानें!
अंकुरास येई वग्धभूमधे जाग!!

१२ ऑगस्ट ४२
विश्रामबाग, सांगली



## ४. लढाइ !

[ छंद : नववधू

नग बाई ह्यी दोड लडाई !
रडविलं ह्यिनं धायी धायी ग ! ॥ ध्रु. ॥

मागं ह्निनं खाल्ला परान् माजा दाल्ला,
घरादाराचा उनाळा सम्दा जाला !
आग प्वोटांत किति भडकुन जाई !

मजुरीनं खपुन् पोरां घास भर्वून्,
केलं जवान बापई माजं, जपुन्;
ह्रिर कोरडी रान् भिजवी, बाई !

सुना आल्या घरीं, येली फुटल्या दारीं,
म्हौराफळाची आस उमले माज्या उरीं;
गेली प्वारं कशी दूर पैक्यापायीं !!

न्हाइ दिसलीं पुना पिलं माजीं कुना;
घर रण्डकं जालं ! न्हाइ पिकला दाना !
जाळी साव्कार अन् ह्यी म्हागाई !!

जाळूं प्वाट कशी ? लाज राकूं कशी ?
कशी निवल आग पेटलेली कुशीं !
त्वाण्डभर म्हनंल आता कोन – 'आ ई !!'

१६ ऑक्टोबर ४३
पुणं

# .५. सुवर्णमुद्रिका !

[ ही सुवर्णमुद्रिका महाराष्ट्राचे धन्वंतरी डॉ. रा. ह. भडकमकर यांच्या बोटांतील आहे. ]

[ जाति : मुद्रिका

तूं धन्वंतरि, तव कला मोहिते किती !
उपमाया तुजला घेऊं मी रुचिर वस्तु कोणती ? ॥ ध्रु. ॥

ओषधीपती तुज म्हणूं ?
परि कला झिजे अणुं अणुं !
तव कला उदारा ! सदाशुक्ल, वाढती.

संबोधूं रत्नाकर ?
क्षारधी परी दुष्कर !
वाक्सागर, रत्नें नवीं तुझे निर्मिती.

कीं शुक्र नि संजीवनी ?
परि तीहि दैत्यधार्जिणी !
संजीवक हो तव देवदानवा कृती.

अश्विनीकुमारांसवें—
तुलना परि कशि मानवे ?
तूं सुपुत्र भूचा, तुझी थोर माय ती !

कीं जादुगार तूं कुणी ?
परि सृष्टि विरे ती क्षणीं,
स्पर्शांत तुझ्या चैतन्य आणि शाश्वती.

ज्ञानेशहृदय कीं म्हणूं ?
अल्पायु परी कां गणूं ?
चेतवी तुझें दीर्घायु आणि सन्मती.

अनुपमेय हें तव जिणें,
उपमेविण वाटे उणें;
तुज तुझीच उपमा देत रमे भारती.

२० जानेवारी ४४
विश्रामबाग, सांगली

दिवाळींतला

## ६. शिळा पाडवा !

[ जाति : स्वभंगा

घेउनि जाई शेवंतीचा
    निशिगंधाचा गोड बहार,
रातराणिचीं पानें घालुनि
    कमालखानी करि ती हार.
तबकामाजीं पदर रचूनी
    त्याचे एकावरती एक,
लपवुन ठेवी कर्दळपानें
    घालुनि हिरवीगार सुरेख.
"सायंकाळीं 'मोहन' येतां
    गळ्यांत घालुनि अपुला हार,
ओवाळिन मी मंगलारती
    करिन पाडवा बहारदार!"

गायनबैठक खुलली सुंदर
    त्याची कोठेशी भरदार,
रागरागिणी मूर्त पातल्या
    अपुला दावाया शिणगार.
प्रतिभाशाली स्वरजुळणीनें
    उमलुन फुलले कोमल भाव;
स्वानन्दाच्या तरल तरंगीं
    रसिक झेलती नाजुक घाव.

मध्यान्हीच्या गभीर कालीं
उठे 'मालकंसाची' तान,
रात्र उलटली 'भैरवि' गातां–
केव्हा, याचें नुरलें भान!

आणि 'मोहना' पंचारतिच्या
जवळ कलंडुन शेजघरांत,
आर्त मनाने वाट पाहुनी
पडली निद्रेच्याच करांत.
निराशलेल्या जिवास नव्हतें
चैन जराही तरि गुंगींत,
पुष्पें सुकलीं तबकीं, ऐकुन–
करुण उसाशांचें संगीत!
अंधाराचा घालुन शेला
अंगावरती, रजनी थोर–
कणवुन पोटीं, शमवित होती
अंतरिच्या दुःखाचा घोर!

अरुण–उषांचे भाव रंगुनी
मोहोरले पूर्वेला लाल;
दारावर तों टिचकी वाजे
आणि जिवाचा येई लाल!
–"काय बरं हें! कोमेजूनी
गेला बाई, किति हा हार!

आणि पाडवा उलटुन गेला!
        कांपितसे ही जिवास धार!"
—"गायन होतें किती रंगलें!
        काय तयाची सांगुं बहार?
शीण न मानी, सखे! साजरा—
        'शिळा पाडवा' करुं रंगदार!

*        *        *        *

पंचारतिचें औक्षण झालें
        आणि रंगले कंपोल लाल;
अरुण—उषांनीं धरिला होता
        त्या मधु संगीताला ताल!

२२ सप्टेंबर ४४
विश्रामबाग, सांगली

## ७. उपाशी पोट !

[ जाति : दिंडी

पोट जाई आपलें भकाळीला,
तरी बाळांची भूक दिसे डोळां !
आणि अन्नाविण दोन दिस उपाशी–
दिसे थकलेली मालकीण त्याशीं !

दहा घंटे करुनिया पुरें काम,
मिळे पोटाला पुरेसा न दाम;
महागाईला पुरें पडायाला–
कुठे पैका, ही काळजी जिवाला !

म्हणुनि चिमटीमधि पावली धरून,
जाय धान्याच्या दुकानीं फिरून–
आठ आण्याचे जोंधळे उधार–
घ्यावयाला ! निथळली घामधार !

शिरीं ग्रीष्माची आग तशी पायीं,
उरीं, पोटीं उफळून जाळ जाई !
विनवि शेठांना द्यावया उधारी,
क्रुद्ध डोळे तों फांकले करारी !

क्षणीं भिरकावुन पावली, मिजाशी–
उभा राहुं न दे त्यास दुकानाशीं !
धान्य ठिचलेलें किती तळघरांत !
डोंब त्याच्या उदरांत, अंतरांत !!

दिनीं दुसऱ्या तावलें ऊन फार,
आणि कोसळली वरुन मुसळधार;
कधि न कोणी पाहिला वळिव ऐसा;
शिरूं लागे जळ घरामधि भसासा!

तोंच घाबरुनी शेठजी सुदाम,
हमालांना विनविती देत दाम–
"चला, उचला हें धान्य तळघरींचें;
नीट ठेवा धन गोरगरीबांचें!"

परी हालेना जमाचा कुणीही,
वरुन बिजलीचा कडकडाट होई!
पुन्हा धमकीचे वदे शब्द चार,
पुन्हा कोसळली वरुन घोर धार!

चौपटीचा तों मजुरिचा सवाल–
ठोक गर्जे कुणि म्होरक्या हमाल!
दीनवाणें शेठजी करिति डोळे,
आणि उठले पोटांत वायगोळे!

परी दुर्दैवें गांठलें बघून,
मान्य करिती तो दाम अबोलून!
क्षणीं कामाचा जाहला उठाव;
पोट शमलें, येतांच वरुन माव!

१ फेब्रुवारी ४५
विश्रामबाग, सांगली

## ८. विक्रमनगरीस—!

[ जाति : सूर्यकांत

राजन्वति गे विक्रमनगरी! करुं तव जयजयकार। शोभने!
महाराष्ट्रभू—मालवभूचा तूं सुभगालंकार ॥ ध्रु. ॥

पराक्रमाने सुपुत्रकन्या पावन करिती तुला। चमकुनी,
माय जाहली तृप्त पाहुनी दुज्रिया विक्रमकुलां.
विक्रमराजे शकशाली तुज वैभव देती नवें। निमुंनी,
शालिवान—शिवछत्रपती त्या शोभलेत गौरवें.
राणोजी, जनकोजी भूषण खड्गवीर गे, तुझे। गाजले,
रेवा—क्षिप्रा—चर्मण्वतिचें तेज न कधि ही बुजे.
दमयंती रुक्मिणिपरी—आदर्श तुझ्या कन्यका,
लक्ष्मी नि अहिल्यासती—करिती न तुला धन्य का?
विक्रमांत या तेजस्वी तव रक्ताचा संचार। शोभने!
महा०

संस्कृतिची तूं थोर आमुच्या अखंड गंगा जुनी। सुनिर्मळ,
कलावंत, कवि, पंडित आम्हां जिवविति जळ पाजुनी.
महाराष्ट्रिची भावमधुरता कीं वीणाझंकृती। पसरली,
भावबळाचें अधिष्ठान ती मराठीस दे कृती.
कविकुलगुरुची विलासवाणी घुमते क्षिप्रेतुनी। जगावर,
भवभूतीची करुणा देते साथ तया येथुनी.
ते भोज—भर्तृहरीचे—घुमतात शब्द भोंवती,
'वररुची,' 'हाल' अपुली—शास्त्रज्ञ कला दाविती;
कणाकणांतुन परंपरा ही लाभे अपरंपार। शोभने!
महा०

घडण घडविली इतिहासाची नवीन काळीं नवी। शमंदे!
फडकविले तूं मराठियांचे ध्येयध्वज मानवी.
भगवाझेंडा जरिपटका अन् मराठवाणी तुवां। आदरें -
पुजुन हृदयीं, मराठहृदया थोर जोडिला दुवा.
"महाराष्ट्र निर्मून खेळवूं आर्यावर्तामधें। पुन्हा ती -
ऊर्जस्वलता, उदात्तता!" - ही आंच वैखरी वदे.
नृप, कलावंत, पंडित - शास्त्रज्ञ, कवी, आजचे.
हीं डोंगर - सरिता - रणें - बोलती शब्द साक्षिचे;
हुंकारांतहि तुझिया लाभे आम्हां पुनरुद्धार। शोभने!

महा०

२ जून ४५
विश्रामबाग, सांगली

## .१. अरुणची कला

[ छंद : चंद्रकांत

डोलत चाले,
अरु नाचत बोले,
हातवारे करूनीया मोडितो डोळे,
ओहळ वा खडकाळींतूनी ओघळे !
वांकडा चाले,
ओठीं सूर निघाले,
गोड संगीताने सारें घर घुमलें,
भ्रमरानें घरांत कीं गीत गुंजलें?
नाचत चाले,
अरु ठेक्यांत हाले,
खालीवर नाचे घर बोटाच्या तालें,
लाटेवर नाव जणूं सागरीं हाले.
मिचकावले –
कसे हळूच डोळे !
भुवयांच्या कमानींत भाव नाचले,
तारकांचे नाच काय अवतरले ?

१३ ऑगस्ट ४५
विश्रामबाग, सांगली

# .१०. प्रीतीचा शिशिर

[ खरंखुरं प्रेम जडल्यावर तें कधी नाहीसं होईल का? होणार नाहीं किंवा होऊं नये! मग प्रीतीचा शिशिर कां उत्पन्न होतो? हीच या कवितेची भूमिका आहे. ]

[ जाति : केशवकरणी

दृष्टि भिडे दृष्टीला होउन एकरूप लोचनें,
जिवांचीं झालीं संमीलनें. ॥ ध्रु. ॥

पूर्वजन्मिची ओळख पटुनी भावस्थिर जाहली–
काय वा मिळणी गे, आपुली?
आंतर लागुन ओढ, भावतीं हृदया आकर्षणें,
गोडवीं प्रीतीचीं वर्षणें;
देवघेव पुढती निःशब्द प्रीतिची,
अतृप्त राहिली सदैव हृदयीं रुची,
हुरहूर निपजवी विरहमधुरता तिची,
प्रवाह मिनले, संगम झाला, एकरूप हें जिणें,
दिसे न प्रीतिसंगमीं उणें.

वसंत फुलला बघुनी मैत्री दोघांतिल आपुली;
शांतली ग्रीष्माची काहली.
वर्षा वर्षे प्रसन्नाश्रु कीं काव्य प्रतिभेंतुनी,
स्फूर्तिनें महाकवि प्रेरुनी?

नितळ चांदणें प्रीतिदृष्टिसम शारदीय शोभलें,
तरूंतुन झऱ्यांतून बिंबलें.
मधु फळें नि कणसें प्रीतभेट आणुनी,
हेमंत आपुली प्रीती वाखाणुनी,
नाचून खळाळवि घुंगुर पायांतुनी,
दिव्यानंदें रमलों ऐकुन अनुपमेय गायनें,
अलौकिक मधु झंकारस्वनें !

आणि लोपवी हाय ! अकस्मात् कां ती गे, आर्तता ?
मृताची कां पुढती शांतता ?
तें दृष्टींचें मीलन, अधरीं हालचाल हासरी,
लोपली कुठे कंठबांसरी ?
लावण्याचे विभ्रम, हिरवी प्रीतीची पालवी,
फुलोरा कोण, कुठे घालवी ?
ते प्रसन्नाश्रु, तो शारदीय नीलिमा,
ती प्रीतिभेट वा जीवनांतली कमा,
ती अवखळ गाणीं खुलवितीं न संगमा;
कीं आला हा शिशिर, जाहलीं निष्पर्ण जीवनें ?
प्रीतिची तरि गे, वठलीं वनें !!

२५ सप्टेंबर ४५
विश्रामबाग, सांगली

## ११. कडुलिंब !

[ सुनीत : वृत्त : शा. वि.

जातों मी प्रतिवर्षि येथुनि तुझ्या शेजारुनी मोहुनी,
पानांची सुषमा सुरम्य हिरवी ही कोंवळी भारिते;
येतां गोड सुगंध निर्भर तुझा वासंतपुष्पांतुनी,
माझें अंतर मोहरून फुलतें, पानांसवें नाचतें !
कांही लागुनि ओढ गाढ हृदयीं मी येतसे सन्निध,
माझ्या वर्वळल्या मनांतिल जुन्या उद्रेकती तों स्मृती !
पूर्वस्नेह सुगंधरूप धरुनी आलेत नानाविध,
कीं ध्येयें मनिची फुलोरुन मला ऐशापरी ओढितीं ?
निःश्वासें तव गोडवा भरुनिया राहे उरीं मोहक,
प्रीतीचा सहवास तों स्मरतसे, स्नेहाळ वा हासणें;
गेलेलीं मम वैभवें परतलीं वासंतहृत्पोषक,
वाटे, पालवलें मुगारुन पुन्हा सौंदर्यजीवी जिणें !

सारें स्वप्नच ! पालटे सकल, जों वर्षा करी वर्षणें !
लिंबोण्या, कडु दर्प मात्र मिळतीं, लोपून आकर्षणें !!

२९ सप्टेंबर ४९
विश्रामबाग, सांगली

## १२. कलावन्त !

[ जाति : स्वर्गंगा

"पुतळे सुंदर सुबक कोरिले कलामंदिरा शोभवितीं;
अनुपम लेणें प्रतिभेचें हें आपण निर्मियलें जगतीं ?
ठायीं ठायीं कलाकृती या रिझविति जीवा मोहवुनी;
चितारलीं परि चित्रें कधि हीं?– जळकीं दिसतीं कां मधुनी?"
प्रश्न ऐकुनी शिल्पकार तो वदे उसासुन अभिमानें–
"चित्रें हीं–हीं?– नव्हेत माझीं ! रेखिलींत हीं सुहृदानें !
कला अलौकिक पहा तयांतिल ! भावमधुर ही मोहकता !
रंगसंगती अतुल, मनोहर ! काव्यादर्शी कल्पकता !
करुणकहाणी परी तयांची हृदय आंतुनी पिळवटते;
ऐकलीत का ? ऐका !– श्रवुनी मन हें हेलावुन, विटतें !"

"उन्मेषाची नवी प्रेरणा आंतुन देतां प्रतिभेने,
चित्रित करि तो मधुर भावना कलाकार तन्मयतेने.
कला रंगली आणि उतरल्या कुंचलींतुनी भावछटा,
कोमलतेनें त्यांत खुलविलें कल्पकतेच्या रंगपटा.
–'अनिरुद्धाचें पहिलें चुंबन,' 'रथाधःस्थळीं कृष्ण' कुठें.
'राजहंस करुणेचा,' कोठें 'घोर वावळी वात' उठे.
कुठे 'जयंती जळिं बुडणारी,' 'शूर्पणखेची विरूपता,'
'निसर्गशांती' कुठे, वापरी रमली त्याची नवरसता.
आणि लटकलीं मुंबापुरिच्या चित्रें अपुन्या जागेंत,
जीवनांतलीं ध्येयजीवनें गोड झळकलीं रांगेंत."

"स्फूर्ति बहरतां आलेखन करि कलावंत तो कुशल असें;
काय करावें स्वप्नाळुपणें भरितां हृदयीं दिव्य पिसें !
परि न जाहलें चीज तयांचें, रसिक न भेटे कुणी; तरी—
चितारल्याविण राहि न त्याची चतुर कुंचली रमणारी.
फलकांवरती फलक सांठले, पोट बांधुनी करि काम,
ठेवायासहि पुरी न जागा आणि जिवा नच आराम.
एकावरती एक रची ते म्हणुनी माचोळीसरसें;
तळमळुनी अन् प्राण पाखडी जणूं उपटतां हंस पिसें !
दारिद्र्यानें पोट मारिलें कुटुंबियांचें त्यांत यदा,
डोळां पाणी तीव्र खळाळवि अदृष्ट एकांतीं विपदा !"

"नवल न फुगली घरभाड्याची जीवनदाहक थकबाकी,
त्यांत जिव्हारीं घाव धन्याचे हृदय विदारिति एकाकी !
अन् भय्याजी पुढे ठाकतां अेकदिनीं वसुलीसाठी,
सुन्न जहालें मस्तक त्याचें, दारीं ठकठकतां काठी !
करुन मुजोरी, भय्याजींनी शिरुन घरीं उन्मत्तपणें,
वस्तु फेंकिल्या स्वयें अंगणीं, सार्थ कराया भृत्यजिणें !
पहात होते माडीवरुनी धनी खेळ हा हासून,
भय्याजीच्या करामतीची स्तुति करिती मुख वासून !
पाहुनि हें क्षणि चित्रकार तो घरांत आवेगें गेला,
फलक अंगणीं एक आणुनी उद्वेगानें पेटविला !"

"एकामागुन एक लागला आणुनि टाकाया दुसरे,
मौज पाहुनी अधिकच खुललें वरी धन्याचें मुख हसरें !

संवेदन तों होउन हृदयीं तळमळुनी शेजाऱ्याने—
अघोर वार्ता कळवियली मज संदेशध्वनियंत्राने !
धांवुनि आलों आणि पाहिली समोर चित्रांचीच चिता !
ज्वालेजवळीं अश्रुविमोचन करितांना दिसला जनिता !
अर्धजळालीं कशीतरी हीं दोन तयांतिल वांचविलीं,
दाम चुकविले घरभाडयाचे म्हणुन कला ही तरि दिसली.
कणव कलेची कलेलाच ये, गरिबासच ये गरिबाची !
कुणास सांगूं ? दावुं कुणाला करुण आंसवें जीवाची ! !"

१७ ऑक्टोबर ४'५
विश्रामबाग, सांगली

## .१३. माळावरील शिरीष

[ मुक्तछंद

निखारे फुलले !
कडकूं लागली फाल्गुनी आग !
रखरखलीं तापून रानें !
वाफा उफाळल्या शेतांमधुनी भगळी पडूनी !
कढूं लागला मध्यान्हवारा तावतावूनी !
डबक्यांत पाणी चटचटलें !
खालीवर सारा डोंब जहाला !
पांखरें लपलीं कुठे झुडूपीं !
भयाण शून्यता ! !

आणि एकला तूं उभा त्यांत !
निष्पर्ण जीवन ! !
भोवतालिची अंतरांतली,
आग पिऊनी कंठिसी जीवन;
फांद्यांचे खराटे होऊन गेले,
अस्थीचर्मांचे सांपळे जणूं उरलेत हे;
वाळल्या शेंगा पिवळसर—
मात्र लटकुनी भेसूर आवाजें खुळखुळतीं !
उध्वस्त ध्येयांचीं पिशाचेंच कीं ?

जीवन मिळतें कोठून तुला ?
आणि कशास्तव पंचाग्निसाधन घोर चाललें ?

हिरवीं वाट सुंदर पानें–
हिरव्यापांढऱ्या मृदुल फुगीर परागांचीं तव मोहक फुलें,
सुगंध जयांचा घेई ओढूनी अंतर्भावना,
सौंदर्य जयांचें उपकारक,
वर्षा–हेमन्तांनी वाढविलेला तेजस्वीपणा किती अभिजात,
नवीन वाऱ्याने दिलेले सूर वितळवूनी–
सुगंधांतूनी दिले जयांनी वृद्ध–युवका,
तरुणांनी जी हृदयावरी ठेवीली भूषा,
आणि प्रमदांनी पुरंध्रीनीहि–
शिरोधार्य जीं, मस्तकीं धरिलीं,
शिशिराने तीं धुळींत गाडलीं ! !

किंवा जाहला हृदयपालट फुलांनी तुझ्या,
अन्यायें अथवा फिरलीं मस्तकें?
म्हणुनी तयांनी जग पेटविलें;
तरी लटकलीं मृत शरीरें फांदीफांदीवर ?
कुणासाठी हें चाललें तपन ?
उराशीं कां तूं हीं शवें धरिलीं ?
भोंवतालचे अन्याय, जुलूम, उपासमारी,
वाममार्गांनी संपदेची वा लूट होऊनी,
धरणी पडली असहाय ही !
आणि पाहून हृदय तुझें तळमळलें,
भाजून निघालें तडफडून,

उपाय हरले म्हणून होऊन विरक्त तुवां हा—
संन्यास घेतला ?

प्रतिकाराची प्रेरणा फसली,
म्हणुन पुन्हा चालविली ही ध्यान—धारणा ?
त्यागिलीं पानें, त्यागिलीं फुलें, त्यागिलें जीवन !
मात्र उराशीं हुतात्म्यांचीं हीं धरुनी शवें,
भगीरथापरी उद्धरायाला गंगाजलानें,
नव्या तेजाची नव संचणी चालविली का,
जुन्यांतून ही ?

खुळखुळूनी चमकुनी तों हंसलीं शवें !
तापलेली येतां झळ नवीन,
विवळून एका फांदीमधूनी सूर निघाला—
"जीवन घेतों शोषून आंतून,
आणि कुंडलिनी जगविते मला अमृत देऊन,
अमृत तेंच दिधलें बीजांना,
अमृत तेंच आंत सांठलें,
जातील शवें हीं गळून दूर माती होऊनी,
अमृतजीवनें कोंभ येतील नवीन परी,
कोंवळीं पानें चमकतील.
आणि त्यावर मोहरेल गोड नवा फुलोरा;

बहरेल त्याच जीवनीं अंग,
हिरव्या पांढऱ्या मृदुल फुगीर परागांचीं मग मोहक फुलें,
शांतिजीवनार्थ शांत आहुति द्याया सुगंधी, दाहक होतील.
हेच जीवन! हेंच जीवन!! हेंच जीवन!!!"

२१ ऑक्टोबर ४५
विश्रामबाग, सांगली

## १४. यज्ञवीरांस औक्षण !

[ जाति : नवनरूणी

ओवाळूं आरती । सुमंगल
ओवाळूं आरती,
आगमने तव आज उदेली विपवाळी भारतीं ।। ध्रु. ।।

मंत्रोदक शिंपिलें । तुवां नव
मंत्रोदक शिंपिलें,
मंत्रोच्चारें ठायीं ठायीं पेटविलीं स्थंडिलें !
मंत्रपुष्प वाहती । वेदिवर
मंत्रपुष्प वाहती,
जयघोषें ती चेतवती, कर होमुनिया आहुती.

धूम्रज्वाला किती । भडकल्या
धूम्रज्वाला किती !
किल्मिष सारें अंतराळिचें जाळुनिया टाकिती.
मंगलता भोंवती । पसरली
मंगलता भोंवती,
नव तेजानें दिपुन, अंतरीं राक्षस थरकांपती !

यज्ञवीर यापरी । होउनी
यज्ञवीर यापरी,
भूमि आपुली पावन केली तुवां ऋत्विजापरी.

उज्ज्वल सेवारती। पाहुनी
उज्ज्वल सेवारती,
यज्ञ चालतिल भूमंडळिं या मुक्तिस्तव भारतीं!

रक्त तिलक लाविते। म्हणूनी
रक्त तिलक लाविते,
मुख कुरवंडुनि पंचारति ही तुजला ओवाळितें.
महंत सदनाप्रती। पातलां
महंत सदनाप्रती,
'दीपावलि' ही म्हणुन कराया प्रेरी तव हुंकृती!

८ एप्रिल ८६
विश्रामबाग, सांगली

## १५. फियाद !

[ छंद : परिलीना

“थोबालींत पगा आईनं दिली !
ललली म्हनून—अश्शी मालली !”
काडकन गालीं मारून घेत,
“अं—अं—अं !”—अरुण हुंदके देत—
आजोबांच्याकडे जाऊन, वरी—
रडत फिर्याद दाखल करी.

चुंबनाचा क्षणीं शिक्का जाह्‌ला,
अर्ज आजोबांनी दाखल केला ?
आणि सुनावणी सुरू करून,
जबानी घेतली—‘उगी !’ म्हणून.

गंगायमुनांची साक्ष जाह्‌ली !
हुंदक्यांनी बाजू छान मांडिली !
आत्मसमर्थन भोकाड करी—
‘काई शुद्दा केलं नाइ !’—यापरी.

“आंघोळीस गेलं नाही कोण तें !
बोललं आईस कोण उलटें ?”
न्यायासनाचे हे प्रश्न ऐकून.
“मीच !”—आरोपी बोले अरुण.

"थोबाडींत दिली उगीच कां ग?
काढून म्हणावं, आई, ती घे ग!"–
निकाल दिला हा न्यायाधीशांनी,
गालावर पुन्हा शिक्का मारुनी!

आईने तों ओठ ठेवून गालीं,
'थोबाडींत' ओढूनिया घेतली!

२५ ऑगस्ट ४६
विश्रामबाग, सांगली

# .१६. सम्राट्

[ प्रियसुहृद् श्री. वि. स. खांडेकर यांस ]

[ सुनीत : जाति : भूपति

ये पुनः पुन्हा तूं असाच येथे, राया,
किति शोभा येते तूं येतांच घरा या !
या पर्णकुटीचा होउनिया प्रासाद,
ऐश्वर्य लाभतें घुमतां तव पडसाद.
शासिते जगाला वाटे येथुनि वाणी,
ऐकतां मुखांतुन तुझिया दीनकहाणी.
तव भूतदयेचा उदंड पाहुनि भाव,
हातांत वाटतें राजदंड घे ठाव.
तव शद्बांतुन जे सुटती नव आवेश,
फिरतात हेर कीं घेउनि बहुविध वेश ?
तव कीर्ति वाटते शुद्ध–सुवर्णी मान,
सम्राटशिरावर किरिट शोभतो छान !

परि वैभव दावी लोकशाहिचा थाट,
तव गीता गाई गरिबांचा नव पाठ.

२५ ऑगस्ट ४६
विश्रामबाग, सांगली

## १७. सुवर्णा !

[ एक कथाकाव्य ]

[ मुक्तछंद

"कशाला घातली तुवां मागणी ! !
जीवन माझें — ! जीवन माझें ! काय सांगूं तरी !
कशाला उगाच ओढवून घेसी नाश आपुला !
यौवन तुझें नव तेजानें बहरलें हें !
दिव्य अमृतानें जणुं भरला अमृतकलश,
विक्रम केले पंचविशींत आत्मसामर्थ्यें तुवां महान;
रूपसुंदरा ! मोहनी तुझी कुणा न आकर्षी ?
शुक्राचें तेज वोसंडते नव हेमदीप्तींनी,
केवडयाचा किंवा परिमळ सांडे पानांपानांत !
गुणगंभीरा ! खादीवेश हा शुभ्रनिर्मळ किती शोभतो !
कर्तृत्वाचें यश शुभ्र सांठलें शुभ्र वसनीं.
तुझ्या किरणीं किती रवींद्रा ! पद्में फुललीं !
किती जीवनें लागलीं मार्गा,
उंचावली किती तुझ्या सहवासें;
आणि लोळणारी धुळींत नित मी !
कशाला शिवूं मी नितळ तुझ्या उज्ज्वल करा !
कशाला घातली तुवां मागणी पतितेस या !"

अधोमुख झाली दीनवदना,
डोळयांमधुनी थेंब गळाले गहिवरतां !

"पतिता–! काय बोलसीं तरी!!
सांग करुणे, तव कहाणी! अधीरला जीव!!"
व्याकुळून, आर्त रवि बोलला.

"लावून घेऊं नकोस मनाला असें बोलणें.
कोमावून जातो प्राण पाहूनी व्याकुळता ही!
कसा करूं धीर पण–सांगाया तुला चरित!
काय सांगूं–? करूं कशी मांडणी?
तडफडे जीव आंतून किती!
सर्वथा अयोग्य, अकुलीन, हीन जीवित केलें!
तुज पूजाया आणूं कुठूनी फुलें निर्मळ!
आसवेंहि माझीं नाहीत पवित्र,
श्वास न राहिला शुद्धरूपांत,
शुद्ध स्नेहाचे नीरांजन आता तेवती न नेत्रीं!
पूजा कशी करूं तुझी मग मी?"
–बोलूनी मुकी अधोवदना पायनखांनी माती टोकरी;
टपटपले पदराबरी कढत थेंब आणि जिरले!
जणुं उदाराने पोटीं गिळली दुःखकहाणी!
चंद्र हासला तों डोंगराआडून वर येतांना!

"निर्मळ फुलें! असें का आज बोलसी सांग?
कळूं दे मला अंतर तुझें;"
(पाठीवरूनी रेशमी हात रवीचा फिरे!)

"रवि तुझ्यासाठी किती करुणे, भुकेला पहा!"
(क्षण करुणेनें डोळे झाकले!
अंग थरारलें, शहारे उठून रोमरोमांत!)
आर्जवी डोळे उघडूनीया बोलली पुन्हा–
"धुळींत मळलीं माझीं सुमनें!
पाणी आटूनी चिखल वांट्यास माझीया आला!
कशाला सोनेरी कर स्पर्शिले!
सांगतें कहाणी म्हणजे तरी–
परत घेशील शद्ब अपुला.
माहित आहे का कोण मी, कशी?
शहारेल अंग ऐकतां सारें!"

लावण्यकांती कमलिनीची मलूल झाली!
हृदय आणिक धडधडले!!

"तापलेला रस ओत कानांत!
पोलादी अंतर तयार केलें– संकोचूं नको!
जीवनांतलें कठिण कठिण ऐकवी मला!
वज्रपातेंहि न ढळेल माझें अचल अंतर!
हृदयांतल्या अमृतरसीं विरेल सारें–
एकरूप होतां आपुलीं मनें!
सांग! सांग तुझी भीषण कहाणी! संकोचूं नको!"

"रवि, किती मन उदार तुझें सागरापरी,
लवण घेऊनी अमृत द्यावें! थोर करणी!

लाज वाटते रे! लाजीरवाणी कथा सांगाया!
क्षमा करी मज— धीर दे मला— हासूं नकोस दोष कळतां!"

सावरून मग मन, पदर भरल्या डोळां,
सांगू लागली —
"गरिबीच्या माझ्या संसारीं होतें अधिराणी मी!
वडिलांनी जोड पाहूनी दिली आणि लोपले!
अधिराजांच्या सुखसगमीं रमलें जरा;
गोजीरवाणा बाळ कुशीत तन्मयलें किती!
दुर्दैवानें तोंच सौभाग्यावरी घाला घातला!
आणि दीन झालें पोरमाय चंद्रमौळी घरांत!
संकटीं धावून नात्याची माया येईल कशी?
कमळ न कधी कुण्या जन्मांत वाहिलें पायीं,
देव तरी का धावून यावा?
माणसांची मग कथा काय ती!
फाटक्या पंखांत पांखरूं राखिलें!
आणि अर्धपोटीं दिवस काढिले!
तोंड भरायास बाळाचें, केलीं मोलाचीं कामें!
लाज, प्रतिष्ठा बाजूस सारीली!
आईच्या मायेनें परदारीं गेलें!
रूप, तारुण्य आकर्षीत होतें माझें कुणास,—
आणि तेंच देई कामें नवीन, टावें न मला हें!!
वात्सल्य दावूनी बाळास माझ्या, धनिक मला जवळ करी—
करुणाश्रूंनी पाणावून डोळे;

ओलावा जरा दिसला तिथे;
—हाय! दिसला फुलाखालीं पण सर्प विखारी!
सुगंध घ्यायास माझ्या देहाचा जवळी आलेला!
लावण्याची माझ्या स्तुति ऐकीली!
मूकभाषेनें मी घर सोडलें!
आणि दोन दिस उपास काढिले!
पोट जाळायाचें होतें ना पण!
आणि बाळाचा काय अपराध?
काहूर माजलें डोक्यांत! वीज कडकडली!
उगाळले डोळे आणि वर्षल्या पुन्हा अश्रुधारा!
सांगूं कुणाला?
दुसऱ्या दिशीं दुसऱ्या जागीं धरीलें काम निलाजरेपणें;
अनुभव काय आगळा यावा?
कामतरू सारे डवरलेले कामवनांत!
अश्रुफुलांचा फुलोरा वर,
दर्प आंत दाट कामवासनेचा!!
गुदमरलें हिंडून हिंडून,
आईची पोटाग, आईचा उमाळा शोधीत वेडी!

शिकण्याची आस त्यांत उदेली;
वाटलें शिकून करावें कांही सार्थक थोर;
पूर्वजीवनींचा दबलेला वर उफाळे उमाळा;
वात्सल्य त्यांतच जीवास ओढी,
कल्पनातरंगीं तरंगलें किती डोळे लावूनी—

ध्येयजीवनीं !
गुदमरलें ! गुदमरलें आंतले आंत कुढूनी कढूनी !
डोळ्याचें पाणी नाही खळलें,
कोरडी भाकरी आंसवांनी ओली करून खाइं !
'शिकून आपण मोठें व्हायचें,
आणि बाळाला करायचें थोर दीनोद्धारक !'
स्वप्नरंजनीं या रंगलें मन;
कुण्या दारीं पण फोडायचें हें कपाळ फुटके ?
पैशाभावीं झालें दीन, लाचार !
अंधारांत दिस काढले कांही,
कंटाळा आला या हीन जीवनाचा !!

आणि एक दिस – तिन्हीसांजची –
अंधारींच होतें बैसलें घरीं एकली, उदास !
प्रौढ विधुर सभ्यपणानें कुणी येऊनी,
बोलणें कराया थेट पातला मज समोरी– !
लाज वाटते पुढील कथा, सांगाया रवींद्रा !
कशी सांगूं तुला – ! जीव टांगतो !
खातेऱ्यांतल्या जिण्याचें काय वर्णन करूं ?
स्वप्नरंजन गोड वाटलें,– ध्येयाची वा तीव्र ओढ लागली, –
कठिण जिण्यास कंटाळलें, – वा दुबळी जाहलें –
सभ्यतेची त्याच्या छाप पडली !
औदार्यानें मन भारून गेलें,

दोष दे रवींद्रा! हवा तर मला—
वैरीण पतितजीवनाची मी
जाहलें रखेली!!
महिन्यांतलें चार दिसांचें जीवन विकलें!
रौरव नर्काचें साधन केलें!
कोळसा केला जीवनाचा मी!
कोहिनुराची आशा धरुनी 'होकार' दिला!!

भडकली किती आग पोटांत!
तळमळ आणि तीव्र जाहली मारितां मन!!
प्रळय जाहला पहिल्या भेटीत!!! स्त्रीलाच कळेल दुःख त्यांतलें
आकाश पेटलें आंत बाहेर!
होरपळूनी सत्वजीवन राख जाहलें—!
कशाला पण वर्णनें त्याचीं तुझ्या समोर?
सुकुमार तुझे जिणें उदात्त कर्तृत्वशाली—
सांगतें तुजला सार त्यांतलें—
पोट जाळिलें त्याच्या पैशानें माझें—बाळाचें!
आणि ध्येयाचा मार्ग धरिला,
समाधान हेंच एक त्यांतलें,
दैवयोगें यश लाभत गेलें अध्ययनांत;
आपुल्यापुरती जाहलें प्रज्ञ स्वावलंबी मी;
आणि त्या जीवना निरोप दिला तप्त मनानें!"

निःश्वास दीर्घ पुनः सोडितां पाणावले डोळे!
पुन्हा पदरानें टिपली कहाणी!
चांदण्यांत सृष्टी पोहत होती धवल निर्मल सर्व होऊनी!

खिन्न हासून करुणा बोले–
"शिक्षिका होऊत कंठित आहें स्वतंत्र जिणें,
झिजवितें माझें सर्वस्व माझ्या बाळाकरितां;
कर्तृत्वशाली होईल अशी देतें शिकवण,
समाधान हेंच एकलें जीवाचें!
पातकें जळावीं कायामनाचीं–
म्हणून सेवेचें होमकुंड हें पेटविलें मीं!
आहुती पडूनी स्वर्ग साधेल तोच सुदिन!
कसलें जीवन! जीवन का हें?
डागळलेलें फूल, निर्माल्य!
पवित्र पूजेला तुझ्या सर्वथा अयोग्य! अपात्र!!

तेजस्वी किती देशोद्धाराचें जीवन तुझें!
देशाभिमान साक्षात प्रखर तेज अग्नीचें,
त्यागशीलता लाजवील तुझी महात्म्यासही,
लावण्यवती राजकुमारी चालून येईल तुझ्या पायांशी!
कशाला निर्माल्य, हिणकस हें–!"

"नको, नको असें पवित्रे! बोलूं!
अकरुण वाणी हृदय करुणे! दुभंग करी!

काया डागळली ?– डागळली थोडी – !
पण मानस राहिलें विशुद्ध अन्तर्गाभ्यांत;
आणि आतां दोन्ही होमकुंडांत पावन झालों !
तनमनांचें बावनकशी सुवर्ण शुद्ध तावून निघालें,
'सुवर्णा' म्हणूनी खरी तूं एक !
साधुचरिताची पूर्वकहाणी असते अशी,
पुरतें पावन व्हायास दिला भविष्यकाल;
विराट जीवन आपुल्या पुढे;
महान त्यागाची आहे जरुरी,
चल पेटल्या होमकुंडाच्या जवळी उभे राहूं आपण,
आणि हात धरूं एकमेकांचे घट्ट हातांत;
बाळास घेऊन पवित्र सुवर्णे ! चल संगतीं,
भावी महान जीवनासाठीं !"

* * * *

अमृत वर्षलें स्वर्गामधूनी !
रातराणीचा फुले फुलोरा !
धवळलें सारें सृष्टीजीवन !
स्वर्गधरेच्या रुद्रवीणेंतून आणि झंकारलें नवें संगीत !

२६ ते २८ सप्टेंबर ४६
विश्रामबाग, सांगली

## .१८. हतभागिनि गे!

[ जाति : पादाकुलक

हतभागिनि गे! पाहुनि कोठे
टाकूं तृप्तीचा सुसकारा ॥ धृ. ॥
घरभेदानें नाश जाहला,
लंगर तेंव्हा पायीं खिळला,
खळखळणारें गाणें त्याचें दावी भंवती भेसुर कारा!
नादानांची झाली भरती;
स्वार्थासाठी अवघे मरती;
पशुवत् झालें जीवन! घाली धनी पोटभर तरी न चारा!
अवर्षणांचा वणवा भडके,
रोग-सांथिचें निशाण फडके,
अर्ध्यापोटीं वणवण फिरतों दीन होउनी दारोदारां!
पोटापुरतें अन्न मिळेना,
लज्जेलाही वस्त्र पुरेना,
'सुजला-सुफला-ओदनवतिला' खाया मिळती सर्वंव गारा!
'लक्ष्मीचें' नव खड्ग चमकलें!
'न्यायमूर्तिनी' रक्त ओकिलें!
'बालपाललालादि' विभूती व्यर्थचि घेती कीं अवतारा?
अंदमानचे निष्ठुर फटके—
अजून हृदया देती चटके!
लाठीखाली सत्याग्रहिचें रक्त सांडुनी गळल्या धारा!

येइ महात्मा द्याया शांती,
जवाहिराची झिजली कांती!
उदार बंधुप्रेमा लागे, हाय! सुऱ्यांचा निर्घृण मारा!
'गतशतकांचीं पापें घोरें,'
क्षालायाला दिधलीं रुधिरें!
'सुभाष, लक्ष्मी' परि न पाहती स्वातंत्र्याचा पुरता तारा!
भेदनीतिने घुसळायाचा,
जीवनधी तव किती दिन साचा?
अमृत वावुन विष द्यायाचें, टिकवायाला कीं डोलारा?
केव्हा मंगल दिन यायाचे,
तृप्तितेज मुखिं नाचायाचें?
आणि आमुच्या हिमालयाचा अखिल जगा वाटेल दरारा?

१ ऑक्टोबर ४६
विश्रामबाग, सांगली

## .१९. न्यायमंदिरांतील वादी !

[ जाति : लीलारति

पाठीवर ओझें ऐशींचें बैसलें !
रोगांनीं ठाणें जीर्ण शरीरीं दिलें !
तिरकमठा तनुचा होई कोरेपरी,
लाळेनें मुखपद दोरीपरि सांधलें !

चालतांच लागे धाप एकसारखी,
परि वादबुद्धि झाली न मुळीं पारखी;
दोहात जमीनीसाठी वणवण फिरे –
न्यायालयिं, लागे अन् जीवित सार्थकीं !

काढुनिया बाडें माळयावरलीं जुनीं,
काढितो पुरावे कागद हा चाळुनी
"जाहला पराजय खाली" – म्हणतो "तरी
मागेन दाव मी वेगें वर जाउनी !"

जणुं तारुण्याची उमेद संचारली !
अभिलाषा अंगीं नसींनसीं बाणली !
भाउबंदकीची भाषा कुणि बोलतां,
वक्तव्य कराया जिभली सरसावली !

मिळणार संपदा जणुं कोटीची नवी,
तरि न्यायकहाणी पुनःपुन्हा ऐकवी;
ती स्वर्गी न्याया मिळे जणूं पेटिका,
या विभवें, वाटे त्यास, लाजतो रवि !

वात्सल्य न फोडी कधि या पाम्नर घरीं !
थोर पूर्वजांची क्षिति न यांस अंतरीं !
देश धर्म यांची स्मृति न राहिली जरा !
'सायुज्य' लाभतें न्यायालय – संगरीं !

स्वर्गांत कुचंवुन जाइल याची मती !
धार वादप्रिय हा तेथ कशावर रति ?
"देवांनो ! उभवा नवें न्यायमंदिर,
यमराजमंदिरीं द्या वा याला गति !"

०. ऑक्टोबर ४६
विश्रामबाग, सांगली

## .२०. भाऊबीज !

[ छंद : श्यामाराणी

तुझे डोळे पंचारती,
भावनेच्या वळल्या वाती,
प्रेमें तेथुनी या ज्योती,
जीवनातें उजळिती.

तुझा भाव बीजकोर,
तेंच माझें तेज थोर,
मार्ग दावुनी समोर,
जीवनीं या नेतसे.

झाला कोरेचा चंद्रमा,
पूर्ण विकासे पौर्णिमा,
नितळ नभाचा नीलिमा,
अन्तर्बाह्य धवळला.

२५ ऑक्टोबर ४६
विश्रामबाग, सांगली

# .२१. दुधावरली साय !

[ आपली नातवंडें ही दुधावरल्या सायीसारखींच असतात. ]

[ छंद : श्यामाराणी

तुझ्या गोड हासण्याचें
      चांदणें हें पसरलें,
गोकुळाच्यापरी माझें
      घर सारें धवळलें !
तुझ्या दृष्टींतलें तेज
      नितळ हें वोसंडलें,
कानेकोपरे घराचे
      त्याने माझ्या उजळलें !

तारकांच्या तेजाची वा
      बाई, केलीस संचणी,
आणि उधळली तीच
      तुवां हांसून मोहनी ?
इवल्याशा गालखळ्या
      गोड भरले सागर,
कुणींहि ग यावें आणि
      ओठीं भरावी घागर.

आणि बाई, तो हुंकार!
गोड किती किलबिल!
संगीताची नोमतोम
कोण सांग विसरील?
ब्रह्मवीणेचे का सूर
गोड तुवां मेळविले,
आणि छेडून हळूच
घर माझें घुमविलें?

स्वातंत्र्याच्या विजयाचा
साधूनिया ग मुहूर्त,
आलिस तूं माझ्या घरीं
स्वतंत्रताच का मूर्त?
नाहीतर आनंदाचा
उसळला का सोहळा,
घर नाचलें आनंदें
जीव पाहून कोंवळा?

कन्याप्रेम द्यावयाला
आली घरा तुझी माय,
आणि आतां झालीस तूं
'बुधावरली ग साय!'

उपजवूनी ही माया
    जाशीं आपुल्या तूं घरीं,
ओतायाला हासण्याने
    आनंदाच्या वर्षासरी ?

तात माय, आजेआजी
    तुज धरिती पोटाशीं,
दृश्य हेंच मनोहर
    सुख माझें अविनाशी !

१४ जानेवारी ४७
विश्रामबाग, सांगली

# .२२. शनवारवाड्याचें स्वप्नरंजन !

[ भारताला स्वातंत्र्य मिळालें त्या रात्रीं पुण्यांतील शनवारवाड्यावर तिरंगी निशाण लागलें व चौघडा-सनई झडूं लागली. तीं ऐकून शनवारवाड्याच्या भिंती जाग्या झाल्या व त्यांनीं पुढील उद्‌गार काढले. ]

[ जाति : सूर्यकान्त

तुडुम् तुडुम् डुम्डुमे चौघडा सनई भूपाळी । आळवी,
कोण चामरें स्वरभावांचीं हीं मजवर ढाळी ? ।। धृ. ।।

मृतप्राय या शुष्क जीवनीं उठली नव लहरी । कशाची ?
थरारुनी कां नवी चेतना हृदयीं वायु भरी ?
नसानसांतुनि रक्त सळसळे कां आवेगाने । स्फुरुनी ?
खवळुनि अंबर काय टाकिलें पुन्हा निशाणाने ?
मरगळलेल्या भावनांस ये प्रसन्न कां जाग । आज ही ?
वाऱ्यावर कीं भेटाया ये कुणी महाभाग ?
मुळामुठेच्या महापुरावर ही कसली उकळी । हासते ?
कोण चामरें स्वरभावांचीं हीं मजवर ढाळी ?

किंवा बाजी तलवारीची फिरत करुनि आले । घराला
मराठशाही ताजिम देते सरसावुन भाले ?
पानपताचें अपयश कोणीं पराक्रमें धुतलें । आपुल्या ?
बाळाजींचे आनंदाश्रू तरि कीं अवतरले ?

माधवरावांचा ध्वज कोणीं वा अटकेपार । रोविला ?
राघुभरारिस अनुतापाचा कीं बसला वार ?
रावबाजिची कीं अवकाळी रात्र कुणी उजळी । यशाने ?
कोण चामरें स्वरभावांचीं हीं मजवर ढाळी ?

महाल पाडुन, काळिज माझें हातीं चुरमळलें । जयांनी -
विरमुन चित्तीं, ते उभवाया कीं इकडे वळले ?
शहाणपण वा कीं नानांचें होउन साकार । पातलें ?
बारभाईंचा चढवायाला आले प्राकार ?
पाटिलबावांची पुण्याई ये प्रेरक दारीं । धावुनी ?
शिल्पकार नव मराठिचा ये घडवाया नगरी ?
छत्रपतींचा सुयशस्वी कर हळूच कुरवाळी । येउनी ?
कोण चामरें स्वरभावांचीं हीं मजवर ढाळी ?

कुणी उभविले आंतिल मजले मराठशाहीचे । पुन्हा हे ?
बुरजावरती लोकशाहिचें निशाण हें नाचे ?
नव युवकांचे लडे भोंवती हे घोडेस्वार । नाचती,
घिरट्या घालिति वरी विमानें कीं मुजरेदार ?
नव्या युगाचे 'बाजी,' 'नाना' चतुराई करुनी । महालीं,
'खूप शर्तिनें राज्य राखितो' मानवता स्मरुनी. !
राज्यश्रीचें वैभव लिहिलें गरिबांच्या भाळीं । विधीनें ?
कोण चामरें स्वरभावांचीं हीं मजवर ढाळी ?

९ ऑगस्ट ४७
विश्रामबाग, सांगली

## .२३. खरी कविता !

[ छंद : चंद्रकात

तुझी आठवण होता । लागूनी ओढ,
जाई भाव थरारूनी । झंकारीं जोड,
गीत घुमतें ग मनीं । तुझेंच गोड !

आणि उतरूं मी लागे । कागदावरी –
भाव अंतरीचे सारे । कोमलस्वरीं,
ललताची बरसात । सारंगी करी.

तोंच बोबडे ग बोल । बोलत आंत –
येऊनीया माझ्या गळां । घालिसीं हात,
तकरार कसलीशी । मृदु ओठांत !

काजळकांठ तुडुंबले । काय तलाव ?
तरंगते आशयाची । वरी कि नाव !
हनु धरुनी तूं माझी । सांगशीं भाव.

रूपडें हें, मिणी ! तुझें । किती ग छान !
मोकळ्या या केसांवरी । फीत – कमान,
भुऱ्या ढगीं शुभ्र कोर । वाकडी सान.

टिकली ही भुवयांत । ग लालसर,
झबलें ग मलमली । हिरवें न्यहार,
बूट चिमुकले पायीं । ग तन्हेवार.

"थाटमाट करूनी हा । मुळि न नेई –
हिंडायाला सोनुलीला । बाहेर आई!"–
तकरारीची या झाली । रडवी घाई!

सारगीचे सूर माझे । विरघळले,
खरें 'भावगीत' मूर्त । हें सांपडलें!
खांद्यावरी – खास अंकीं । तें मिरविलें!

२० सप्टेंबर '४७
विश्रामबाग, सांगली

# .२४. झुंजार प्रणति !

[ जाति : श्यामाराणी

वास्तुदेवते ! शेवटची घे प्रणती ही झुंजार ! ॥ ध्रु. ॥
किती पिढ्यांचीं हीं घरदारें,
शेतवाडिचे निर्मळ वारे,
पीत गव्हांचीं पुष्ट शिवारें,
हाय ! जळालीं, प्रखर वर्षतां अन्यायी अंगार !
माय वृद्ध जळली अंथरुणीं !
बाळ झेलिलें खड्गांवरुनी !
भ्रष्ट जाहल्या कन्याभगिनी !
नगरचिता ही आणि पेटतां जाहलाच जोहार !
हात कलम हा झाला उजवा,
झेलुनि घावावरती घावा;
लाल तुझ्यास्तव हा शिडकावा,
उरलों केवळ अमंगलाचा करावया उच्चार !
बांधव कोठे दूर पांगले !
अंगण, रस्ते स्मशान झाले !
पंच नद्यांतुन रक्त रंगलें !
राजपथांतुन घोर पेटले सरणांचे संभार !
दाट धुरांचे लोट भोंवती,
प्रेतांचा खच अवतीभंवती,
क्षुधित गिधाडें वर वावरतीं !
भेसुर किंकाळ्यांचे बसती हृदयावर हे वार !

पूर्वज तुजला पराक्रमाने –
प्रतिष्ठापुनी जगलें मानें,
पितापितामह त्या अभिमानें –
करीत आले पुण्य भूमिवर मंगल सुखसंसार !
निशाण त्यांचें हातीं आलें,
आजवरी तें तोलुन धरलें;
रक्तरंगणीं परि डागळलें !
एका हातीं कुठवर वरती तोलुन हें धरणार !
इमान अमुचें राखायाला –
करी देवते ! संग्रामाला;
मम वंशींच्या भगीरथाला –
बोलावुन घे, सगरांचा या करावया उद्धार !

२२ सप्टेंबर ६७
विश्रामबाग, सांगली

# .२५. ध्येयवादी कलावंत !

[ 'बालगंधर्वा'सारखे ध्येयवादी कलावंत आपल्या ध्येयासाठी कोणती उपासना करतात व त्यांची आपल्या कलेवरील निष्ठा किती श्रेष्ठ असते, त्याचें चित्रण या कवितेंत आहे. ]

[ मुनीत : वृत्त : शा. वि.

छोटेसें घरकूल थाटुन कलासंसार केला उभा,
निष्ठावंत उपासना हळुहळू झाली तयाची सुरू,
होता तन्मय ये नवी प्रतिदिनीं प्रेरावया स्फूर्तिभा,
विस्तारे जग आंतलें, उमलुनी लागे तरू मोहरूं.
डेरेदार रसाळ वृक्ष डवरे डौलांत वासतिक,
गेले दर्वळुनी सुगंध, रसिका आकर्षिते मोहुनी;
आले धावुन लोक-कोकिळ कला सेवूनिया प्रेरक,
पोवाडे रसरंग गात बसले आनंदुनी जीवनीं;
वाढे व्याप, कला प्रसन्न विकसे संपूर्ण त्याच्यासवें,
ऐश्वर्यें जणुं लाभतीं नवनवीं सूर्यासवें सारसां;
वाटे शीतळ चांदणें वरसलें आविष्कृतीने नवें,
'येई हा शतकांतला,' कुणि वदे, 'सिद्ध प्रभावंतसा !'

होता जीर्ण तनु प्रभा विलयली ! ऐश्वर्यही लोपलें ! !
बोले तो पण –"सूर्य येइल पुन्हा अन् पद्म माझें फुलें !"

२३ सप्टेंबर ४७
विश्रामबाग, सांगली

# .२६. माझें आवडतें मनोराज्य !

[ जाति : पादाकुलक

आवडतें हें मंदिर माझें
वस्त्राभरणीं शृंगारावें,
दीप विजेचे सुंदर लावुनि
रंगगालिचे हे उजळावे.

उदबत्त्यांचा सुवास सात्विक
पुष्पांच्या गंधांत मिळावा,
मधुर हजारा गुलाबपाणी
फेंकित मधुनी चमकत जावा.

गोड जवारी सुस्वर मिळवुनि
तंबोरे मधु झंकारावे,
सारंगीच्या साथीसंगत
तबल्याचे मधु बोल घुमावे !

आणि तुझी गे ! लकेर फिरती
विरहोन्मादक अष्टपदीची,
'सा विरहे तव दीना' गाउनी,
भावसागरीं उठवो वीची !

नादब्रह्मीं सूर फुलूनी
        रागदारिनें विकसित व्हावें;
आणि आपुल्या हृत्कमलांनी
        त्या चैतन्यें फुलीं फुलावें!

रसरंगीं अन् मिळतां मिळतां
        हृद्‌भावांचे कण वितळूनी,
एकस्वर गे! तूं मीं व्हावें
        चिरशांतीला जाया मिळुनी!

१५ ऑक्टोबर ४७
विश्रामबाग, सांगली

## .२७. महात्माजींच्या समाधीवर !

[ छंद : परिलीना

अरेरे ! अघोरी गोळ्या झडल्या !
आणि रक्तधारा चिळकांडल्या ! !
असह्य वेदना गात्रागात्रांत,
आर्त वेणा आल्या नसानसांत !
खादी धोतरानें धार झेलली,
'धर्मराज' सार्थ पदवी झाली !
प्राणांतिक उठे मस्तकीं शूळ,
अश्वत्थाचें खाली कोसळे मूळ !
पण तुम्हांपोटीं अथांग शांती,
मानव्याची गाढी नितांत भक्ति;
ब्रह्मवाणी बोले "हा: राम ! राम ! !"
आणि तुम्हीं, धर्मा ! म्हटला राम ! !

शतशा विदीर्ण जाहली धरा !
आकाश फाटलें ! दुभंगे चिरा !
सागर उधाणीं कढकढले,
ज्वालामुखीचे हे स्फोट जाहले !
हिमलाट आली वाऱ्यावरती,
खवळलीं महाभूतें भोंवती,
दु:खानें क्रंदून पिटलें ऊर,
रौद्रभयानका करुणपूर –

येऊन, बुडालें जीवन त्यांत,
सत्व विरघळे; वाळू हातांत!
धर्मराजा! कसे सोडून गेलां!
कां हो, मायदेश पोरका केला!!

दीनबंधू आफ्रिकेंत रडतीं!
धुळीमध्ये चंपारण्यें दडतीं!
किसानगीतकें बारडोलीचीं –
वितळतीं, येतां धग अश्रूंची!
धारासनाच्याहि मिठाचें पाणी –
जाहलें, ऐकून 'हाः राम!' वाणी!
दांडीचीं पावलें मरगळून –
थबकलीं जागीं हीं पेंगळून!
उरीं फुटूं आलें हरिजनांना!
चक्रध्वज आज फडफडेना!
समदृष्टीसखा, चैतन्यदायी,
लोपला म्हणून शिणली का हीं!

साम्राज्यें उदेलीं रक्त शिंपूनी,
साम्राज्यें चढलीं परवंचनीं;
आणि मिळतांना धुळींत, रक्त –
सांडती कट्टर साम्राज्यभक्त;
'सत्याचा निर्भय आग्रह, परी,
प्रेम–अहिंसेची निष्ठा अंतरीं,

रक्ताविण करी साम्राज्यें उभीं'
मंत्रदृष्टे तुम्हीं देखिलें नभीं,
महान तपस्या–तेज ओतलें,
जनजनार्दना प्रेमें पूजिलें;
स्वातंत्र्याचा गड तुम्हीं जिंकिला,
गड आला पण सिंह कां गेला!

वसिष्ठ तुम्ही या रामराज्याचे;
श्रीकृष्ण तुम्हीच या भारताचे;
ज्ञानेश सप्रेम भक्तीचे महान्,
बुद्ध, ख्रिस्त, महंमद, भगवान्;
तुमच्या वाणीनें गाणीं रंगलीं,
तुमच्या आदेशीं झाडें फुललीं,
तुमच्या वचनीं सूर्य फिरले,
तुमच्या ऋचेनें स्रोत वळले,
तुमच्या गतीनें तारे फिरले,
तुमच्या दीप्तीनें तेज फाकलें;
जीवनीचें ऐसें चैतन्य थोर,
कां हो, लपवूनी लाविला घोर!

जुन्यांतून केली सृष्टी नवीन,
'कैलासलेणें' कीं खडकांतून?
शिल्पकार नव्या भवितव्याचे,
द्रष्टे ऋषी नव्या युगायुगांचे,

कर्षक नवीन शेतमाळचे,
सेनापती नव्या आत्मबलाचे,
वैष्णव महान मानवतेचे,
'मोहन' सगळ्या सानथोरांचे,
महेश होऊनी जुनें मोडलें,
ब्रह्मा होऊनीया नवें घडलें,
विष्णुरूपीं आला राखावयाला,
आणि कुठें आता गुप्त जाहलां!

कमल उमलें – देठ तुटला!
आंबा मोहरला – बुंधा फुटला!
हिमालय हसे – धरा कोसळे!
तारांगण फुले – आकाश ढळे!
इंद्रधनु खुले – सूर्य लपला!
सप्तस्वर आले – षड्ज लोपला!
नंदन फुललें – स्वर्ग ढासळे!
आत्मबल स्फुरे – जीवन गळे!
ब्रह्मवीणा घुमे – सूर विरला!
अभंग रंगला – विठ्ठल गेला!
शांतिदूत विश्वशांतीचे तसे,
अकालीं बापूजी, लोपला कसे!

गुरुस्थान हिंदभूमी जगांचें,
शांततेचें, गाढ बंधुप्रेमाचें,

स्वातंत्र्याचे थोर अमरस्थान –
करावया तुम्हांवाचून कोण ?
विश्वदेव्हाऱ्यांत तुम्हीं बैसलां,
आंसवांनी करूं अभिषेकाला;
सद्‌गुणांचे तुम्हां लावूं चंदन,
स्वपुष्पांनी करूं नित्यपूजन;
आत्मभाव घ्यावा नैवेद्यासाठीं,
हिमालयीं लावूं सूर्याची ज्योती,
ओवाळूं हा नीरांजन, उदारा !
विनवितों – 'यावें पुन्हा उद्धारा !'

कणीं कणीं वावरावें इथून,
फिरावें विचारा – विकारांतून,
ओतावें चैतन्य लोकमातांत,
आत्मबल द्यावें धान्य – कणांत,
फुलीं फुलीं घाला ध्येयजीवनें,
प्रकाशांत ठेवा नवीं स्फुरणें,
आकाशीं फिरवा तुमची ज्योत,
पक्षी – कूजनांत तुमचें गीत,
जीवनसंगीत हौतात्म्यांतील,
अभंग द्यावे हो, चरख्यांतील;
घडवाया पुन्हा हे साक्षात्कार,
यावें हो पिताजी ! तोच उद्धार !

८ फेब्रुवारी ४८
विश्रामबाग, सांगली

## .२८. महर्षि कर्वे !

[ जाति : प्रणयप्रभा

पसरलीं जळें तव अपरंपार !
भिजविलें तयांनी किती शिवार ! ॥ ध्रु. ॥

जन्मलास तूं ध्येयहिमाचलिं,
घोर तुडविले मार्ग पदतलीं,
कंटकशल्यें अंगीं रुतलीं,
वेगवती पण तव बलधार !

डोंगर, गोटे आले अडवे,
वाहूं न देती दुर्दिवचे गडवे,
निष्ठेचें पण तेजच कडवें,
कांपित जाई कडेकपार !

अवर्षणाची पडतां छाया,
वितळे निर्मळ तव हिमकाया,
आपुलकीची देउनि माया –
मळे पिकविसीं हिरवेगार !

हिमाचलीं तव, तूंच महर्षि,
ब्रह्मपुत्र तूं अमृतवर्षी,

कर्षक तूं, श्रम तव आकर्षी,
स्त्रीहृदयीं तव साक्षात्कार !

तव जल फुलविल खेडुतरानें,
खुलेल भू ही नव बहरानें,
नटेल जीवन सौंदर्यानें,
तुझ्या जीवनें हा उद्धार !

१७ फेब्रुवारी ४८
विश्रामबाग, सांगली

## .२९. मिणीचा खाऊ !

[ जाति : कोकिळा

मिनी कित्ती गोल । तुजी
मिनी कित्ती गोल ।। ध्रु. ।।

बिक्कीटं हीं पग गालीं,
बल्फी ओथाला लागली,
हनुबती तल माजी मुलंब्याची फोल !

दोल्यांतलीं हीं बुबुलं,
कालीं कालीं हीं जांबलं,
चीमनीच्या दातांनी तूं मुक्यांनीच ओल !

हात ऊंस छोते छोते,
शोनकेळी पग बोतें,
पोतावल मोदक हा दिशे कित्ती गोल !

अंब्यानं हें भललेलं –
शालं अंग शाथ जालं !
ओथांनीच मातलं हें थोलं थोलं तोल !

७ जुलै ४८
विश्रामबाग, सांगली

## ३०. स्वातंत्र्यमंदिर !

[ जाति : अंजनी

महात्मन्, करितों जयजयकार !
स्वतंत्रतेचें भारतमंदिर झालें हें साकार ॥ध्रु.॥

निशाण तेव्हा पडलें खाली,
निर्भय तों नव वाणी उठली !
सुधा ओतुनी भरिला पाया वीरांनी भरदार !

रक्त शिंपिलें कुणि खड्गांनी,
आत्मार्पण कुणि फाशीं चढुनी,
भव्य चौथरा उभवी कोणी, रचुन अस्थिसंभार !

ध्येयदर्शनीं सेवुनि कारा,
उच्च उभविला कुणि गाभारा,
चतुःसूत्रिच्या मूर्ति सजविती वरी कोपरे चार.

शिल्प निमुळतें सुंदर वरलें,
कळस आपुल्या त्रिगुणीं भरले,
प्रतिष्ठापुनी मूर्ति, घडविलां तुम्हींच साक्षात्कार !

हृद्भावांचीं फुलें वाहुनी,
रमतों मंगल भावपूजनीं,
फडकावूनी कळसावर हा तिरंगीच अवतार !

१५ ऑगस्ट ४८
विश्रामबाग, सांगली

## ३१. देऊळ बांधणारास–!

[ कन्नडकवि श्री. दिनकर देसाई यांच्या एका कवितेचा अनुवाद ]

[ जाति : इंदुमुखी

बांधितसां मंदिर नव कीं हें प्रभुसाठी ?
भक्तिनेच काय अशा पुण्य पडे गांठी ? ॥ध्रु.॥

मूढ वृत्ति । हाय ! किती !
खेड्यांतुन फिरकवुनी हीच जरा दृष्टी,
झाले किति गरिब, पहा हीन, दीन, कष्टी !

पोटास न । मिळत अन्न !
नाहि निवाऱ्यास गवत, खोपटी, न काठी !
बांधितसां आणि तुम्ही राउळेंच मोठीं !

विश्वभूप । विश्वरूप !
अखिल विश्व कोंडाया बांधणार भिंती ?
हें न तरी, देउळ हें काय तयासाठी ?

घरटेंही । गरिब पाहि !
तें हि मिळे राहण्यास कधि न भूमिपाठीं !
आणि धाम देवास्तव हवें विश्वघाटी !

गवत माति । जरि मिळतीं,
सान खोपटें तयार होय तयासाठी;
संपदा अमोल होय ती गरिबागांठीं !

देवास्तव । कीं हा स्तव ?
बांधण्यास मंदिर हें तव आटाआटी ?
गरिबांहुनि गरिब होय देव काय हाटीं ?

१९ सप्टेंबर ४८
विश्रामबाग, सांगली

# .३२. नांगरयोगी !

[ कन्नडकवि श्री. पुटाप्पा यांच्या कानडी कवितेचा अनुवाद ]

[ जाति : पादाकुलक

हातीं धरुनी सुंदर नांगर खड्या सुराने दे ललकारी,
पहा, पहा तो शेतामधला नांगरयोगी श्रमकामकरी !
शेतीं खपुनी रचितो पूजा आणि फलाशा मनीं न ठेवी;
कर्म आपुलें करि निष्ठेने इहपरसाधन मानुनि सेवी;
श्रमतो अपुल्या अन्नासाठी कष्टुनिया, तो खराच योगी;
निसर्गांतल्या राज्यामधला तोच एकला खराच भोगी.

क्षणाक्षणाला स्फुलिंग उडती क्रांतीचे नव विस्मयकारक,
परी न सोडी हा श्रद्धाळू काम आपुलें जगदुद्धारक;
साम्राज्यें उत्कर्ष पावतीं आणि लोपतीं विलयीं कोठें,
उडूनी जातीं वाऱ्यावरती सिंहासन वा किरीट मोठे;
सैनिक अपुल्या पराक्रमाने नगरानगरा घालिति वेढा,
नांगरणी वा नवी पेरणी परि न सोडि हा जीवनवेडा.

नागर जीवन अमुचें तरतें केवळ याच्या आधारावर,
शोषुन घेई जीवन सारें एक भूमितिल याचा नांगर;
राज्यें शासुनि कितीक गेले दर्पवैभवें हावुनि भूपति,

परि पाठीशीं होते त्यांच्या    गरिब आमुचे हलधर भूपति;
नववीरांचें ऊर स्फुरले,    शिल्पकलेचें तेज चमकलें,
आणि नांगरी सामर्थ्याने    कविकवितांचें विश्व बहरलें !

नांगरयोगी अज्ञात असा    जीवन देई परि जगताला,
कीर्तिसुखाची अन् अभिलाषा    कधि न जराही शिवते याला.
सन्मानाच्या लाभासाठी    घाम न याचे कधी निथळले,
कर्तृत्वाचें तेजहि याच्या    नांगरपात्यामधेंच लपलें;
मंत्रांतुनि वा मंदिरांतुनी    धर्मध्वज किति जरि फुरफुरला,
नांगरपात्यावरी एकला    धर्मध्वज तरि खरा फडकला !

१.७. सप्टेंबर ६८
विश्रामबाग, सांगली

## ३३. आस्थिविसर्जन !

[ पूज्य महात्माजींच्या अस्थींचें भारतातील निरनिराळ्या नद्यांत विसर्जन करण्यांत आलें. हें विसर्जन होत असतांना त्या नद्यांना काय वाटलें असेल व त्या काय म्हणाल्या असतील, ती कल्पना या कवितेंत चित्रित केली आहे. ]

[ जाति : सूर्यकांत

या राजर्षे ! या ब्रह्मर्षे ! यावें अभ्यंतरीं,
थकलां ! शिणलां ! घ्या विश्रांती अमुच्या जळमंदिरीं ! ॥ध्रु.॥

कणाकणांतुन भरल्या तुमच्या पराविद्या तळमळी,
आग तयांची उपोषणांच्या वाढे सत्वानळीं.
हृदय तापलें अन्यायांच्या सात्विक परिमार्जनीं,
जळत राहुनी दिला सूर्यसा प्रकाश किरणांतुनी;
घाम तो निथळला किती । भाळावर मोत्यांपरी,
चमकलीं जणूं अंतरें । दीनांचीं, वा वैखरी !
निःश्वासांनी उष्ण पोळलां ! उसंत ना पळभरी !
थकलां ! शिणलां ! घ्या विश्रांती अमुच्या जळमंदिरीं !

शिकवण अपुली समरसली या थेंबाथेंबांतुनी,
हिमालयांतिल उदात्तता ये गंगेतुन वाहुनी.
पंजाबीचें तेज, दक्षिणेश्वरिची समभावना,
साबरमतिची सत्यअहिंसा, पंचवटी-प्रेरणा;

भक्तिभाव भीमेंतला । कणखरपण सह्याद्रिचें,
उद्रेक भावसुंदर । कर्णाट–श्रीरंगचे,
ज्ञान, कला, संस्कृती सांठली पुरींत, रामेश्वरीं,
थकलां ! शिणलां ! घ्या विश्रांती अमुच्या जळमंदिरीं !

मस्तक अपुलें निरवावें या हिमसित मानसजलीं,
वर्षतील सुर उडुसुमनांची, अरुणांची अंजली.
वाहुनि नेऊं कणकण अपुल्या चैतन्यांतिल उरीं,
शेते भिजवूं भारतांतलीं खतावलेलीं पुरीं;
विहिरींत आणि ओहळीं । ओतून जळें त्यांतलीं,
नेऊन वनीं उपवनीं । प्रेरणा देउं तुंबली,
नसानसांतुन बीजें स्फुरतिल अंकुरनी अतरीं;
थकलां ! शिणलां ! घ्या विश्रांती अमुच्या जळमंदिरीं !

ध्येय आपुलें दिसेल फुललें गव्हाजोंधळयांतुनी,
तरारलेलीं भातखाचरें फुलोरतिल जीवनीं;
अमृत शांतिचें, समतेचें वर मेघ वर्षुनी जरा,
पिकें प्रीतिचीं पिकवायाला सांगतील भास्करा.
चैतन्य बाणतां असें । अमरत्व फुले भोवती,
तारका दिव्य गायनीं । नाचून ऋचा वर्षती.
सार्थक होईल जन्माचें या, वाहुन शिणल्यावरी;
थकलां ! शिणलां ! घ्या विश्रांती अमुच्या जळमंदिरीं !

१५ फेब्रुवारी ४८
विश्रामबाग, सांगली

## .३४. आजीबाई !

[ जाति : पादाकुलक

एक पोटिशीं, एक पाठिशीं
दोन लाडकीं घेउनि बाळें,
अंथरुणावर आजीबाई
पडति, कराया अंग मोकळे.

घरकामाला कधि न विसावा,
सदा दहावी तरुणतरुणिंची;
वृद्धजनांचीं दुखणींखुपणीं
सेवा आल्यागेलेल्यांची.

झुंझुरकाचें फुलल्यापासुन
टिपरीचा या ठेका चाले,
'दीपत्कारें' स्वर आळविले,
तरि तालावर पाउल हाले.

कुरवाळाया परि छबडयांना
अवसर न दिला संसाराने,
उत्कटलेल्या वात्सल्याला
शमविति आपुल्या शिशुसेवेने.

"गोथ थांग ना! – थोपत मदला!"
बोलतिं बाळें विळखा मारुनि;
आतुरलेल्या अंगलगीने
शीण दिसाचा जाई हरुनी.

अंगरजाच्या धन्यत्वास्तव
आजीबाई शिणती दिनभर,
अन् कुरवाळित कुशींत बाळें,
झोप सुखाची घेती निर्भर!

१ ऑक्टोबर ४६
विश्रामबाग, सांगली

## .३५. चंद्रलेखेचा पाळणा !

[ छंद : हरिभगिनी

पाळणा ऽ हालवा बाई, पाळणा ऽ जोजवा !
'चंद्रलेखा' आंत माझी मरळमालीवर निजवा ! ॥ ध्रु. ॥
जावळाची रात्र काळी,
सुरगंगा ही शुभ्र भाळीं,
तीर्थासाठीं नासीकेची वाट नीट मळवा.
चंद्रिकेची अंगकांति,
डोळा नक्षत्रांच्या ज्योती,
इवल्याशा ओठांमधे अमृताचा बाई, ठेवा.
अगलग जरा होई,
व्याधी माझी सारी जाई,
जीवनाच्या औषधींचा झोळणा हा बाई, नवा.
चांदण्याची बरसात,
करी माझी चंद्रज्योत,
कोजागरी मोहरली, वर निळा चांदवा !
'गोविंद घ्या !' करा कुणी,
ठेवा आंत 'चंदाराणी'
ओठीं मला सेवूं द्या बाई, 'चंद्रकांताचा' मेवा !

८ नोव्हेंबर ’८८
विश्रामबाग, सांगली

## ३६. तुझें रूप !

[ छंद : अभंग

“तुझें रूप हिमालयकणींकणीं,
        सूर्याच्या किरणीं वोसंडतें;
तुझें रूप झुळझुळुनी वाऱ्यांत,
        वाहतें झऱ्यांत खळाळूनी;
तुझें रूप भरे आकाशकोंदणीं,
        चांदणी चांदणी मिरविते;
तुझें रूप सप्तपाताळीं झळाळे,
        सूक्ष्मांत आकळे ब्रह्मनादीं !”–
तुझें रूप ऐसे म्हणती ध्यापलें,
        शोधितों भांतलें आंत प्रेमें;
प्रासाद, गिरणी, शिवार, झोपडी,
        करुनि तातडी धुंडाळलीं;
गोजिरें रूपडें दिसे मानवात,
        प्रति हृदयांत आकारलें !

२७ जानेवारी ४०.
विश्रामबाग, सांगली

# ३७. तीर्थरावो !

[श्रीज्ञानेश्वरांनी महान अवतारी पुरुषांचीं लक्षणें सांगून त्यांना 'तीर्थरावो' ही थोर पदवी दिली आहे. महात्माजींना ही पदवी सार्थ शोभते या कल्पनेनेंच हे अभंग लिहिलेले आहेत.]

[ छंद : अभंग

ब्रह्मभाव थोर निर्मुनीया पोटीं,
प्रेम, सत्त्व ओठीं ठेवीयलें.
जाळी किल्मिषातें तपस्या प्रखर,
हिमाद्रिशिखर ठेंगू केलें.
महासिद्धी झाल्या विठीत निर्माण,
वृकप्रातीं प्रयाण भेकडांचें.
जवळीक ओढी भूतांना जवळ,
तोंडीचा कवळ देऊनीया.
शत्रु झाले मित्र, सुहृदांचे योगी,
सत्याच्या प्रयोगीं 'सिद्ध' झाले.
सत्ययुग येथे वेगें अवतरे,
वायूंत भरारे तीर्थरावो.

उपजला भोंती कर्णी कर्णी धर्म,
शिकवूनी मर्म जीवनाचें.
स्वर्गसुखें दुःखामाजीं खेळविलीं,
मोक्षें उजळिलीं अंतरंगें.

'अभय'– अजानवृक्ष उभविला,
सावलीचा दिला थोर थारा.
गोपगणां साऱ्या गुंगवी मुरली,
ओठीं करांगुली फिरतांच.
वनवास संपे, रामराज्य आलें;
दूतगण धाले हर्षकांडीं.
निमाली बांसरी! सरे रामायण!
हाय, हाय! क्षण पातला तो!

शहारतें अंग! थरारतें मन!
अंधाराचे रण माजतांच.
अंधारीं या तप आचरितो घोर,
शिकवण थोर स्मरूनीया.
सूर्यचंद्रामाजी, नक्षत्रताऱ्यांत,
सागरीं, वाऱ्यांत बैसला का?
तेथुनीच फेका थोडीशीं किरणें,
सोडवाया रणें उजळूनी!
भरताचा द्यावा आम्हां बंधुभाव,
पूजूं तीर्थरावो, पादुका या.
रामराज्य मग विश्वासी जिंकील,
अखंड सिंचील शांतिसुधा.

२९ जानेवारी ४९
विश्रामबाग, सांगली

## .३८. शकुनवंती !

[ छंद : पादाकुलक

येई येई भारद्वाजा !
पंख हालवी सोनेरी,
दारीं माझ्या जाई फुले,
बैस मांडवाच्या वरी.
तुझ्या येण्यानें जाहली—
घरा माझ्या शकुनवंती;
सांग कांही शुभ नवें,
दूर करीं माझ्या खंती !

उंच तिरंगी हा झेंडा—
उभारिला माझ्या दारीं,
निवेदाया नवें तया,
वृत्त कांही येसीं तरी ?
भारताच्या स्वातंत्र्याचा,
मायदेशाचा तूं दूत,
सांगायां कीं घरोघरीं,
जाशीं मायेचा वा पूत ?

झोपडींतल्यांना माझ्या,
पुरें पोटाला मिळालें ?

पिऊनी कीं त्यांनी पाणी,
      जठराग्नी शमविले ?
कुडकुडतीं तीं काय
      अजूनिही झोपडींत ?
कुडांतल्या फटींतला –
      वारा शांतला का शीत ?

तापलेल्या जीर्ण कुडया !
      मिळाला का त्यांना दवा ?
गुदमरल्या चाळींना –
      मिळाली का नवी हवा ?
शेताशेतांतून काय,
      नवीं पिकें तरारलीं ?
तरुणांच्या अंतरीं कीं,
      नवीं तेजें भरारलीं ?

अर्थशील श्रीमंतांनी
      सोडियली का 'संचणी' ?
मोत्यांवरी अजुनी वा
      खेळे गरीबांचें पाणी ?
रक्ताळल्या वस्त्रानिशीं –
      देशोधडी जे लागले,

'आपुले ते !' म्हणूनिया
      बांधवांनी कुर्वाळीले ?

विमानांच्या घोंघावांत
      मिळे पाईकांस ताल ?
अनिर्वेद सुखासाठीं –
      होई नौकांची कीं चाल ?
बंधुभाव, बंधुभाव –
      कणोकणीं पसरला ?
पंथ, पक्ष, मतभेद
      वाऱ्यामधे वा विरला ?"

स्वातंत्र्याच्या वैभवाने –
      संपन्नता शिगे आली ?
दिसलीं की भारतांत
      स्वप्नें अशीं खरीं झालीं ?
व्याकुळतो प्राण माझा,
      निस्तेज या वैभवानें !
आग भडके अंतरीं,
      स्वार्थांधांच्या दुर्दृश्यानें !

तुझे पंख मोहक हे !
      तुझी सुंदर भरारी !

तुझी पायधूळ शुभ –
    उजळिते विश्वें सारीं !
बैस, बैस सख्या ! जरा –
    माझ्या जाईमंडपांत,
सांग, नवें गूज कांही,
    तप्त मन व्हाया शांत !

२० सप्टेंबर ४०.
विश्रामबाग, सांगली

## ३९. साताऱ्याचें सोनें !

[ जाति : पादाकुलक

कुलदेशाची कीर्ति स्मरुनी
नव्या युगाशीं समरस झाला,
महात्मतेच्या संदेशानें
नवा फेकिला तुम्हींच भाला !

वर्षर्तूच्या सरीसरीनें
नवीं शिवारें बहरा येतीं;
कृष्णाकाठीं तशा उभारी
नव तेजाच्या ग्वाही देती.

पानापानांवरले मोतीं
मिळनीं ओघळुनी बुंध्याशीं;
तसे तिरंगी झेंड्याखाली
जमुन आर्द्रता विघलीं खाशी !

थरारलें आभाळ अंतरीं
पाहुनि तेजें या भूवरलीं !
पारतंत्र्यतम करि पोबारा
पाहुनि 'शंभर वर्षे भरलीं !'

आणि एक दिस ये सोन्याचा
    स्वातंत्र्याचें शिंपित पाणी;
सुवर्णभूमी नांव जाहलें
    सार्थ दावितां तुम्हींच पाणी !

कण कण मिळुनी खाणीमधले
    मुशींत होती एक जिवाचे,
लगड तयांची हो अंगारीं,
    सुवर्ण होई सातान्याचें !

एक जिवाचे आपण भाई
    ध्वजा उंच धरुं भारतभूची;
एकआंतडें गर्जुन सांगिल—
    'लाभे न कुणा असली उंची !'

७ ऑक्टोबर ४९
विश्रामबाग, सांगली

## ४०. देवी आर्द्रते !

[ छंद : अभंग

येई आर्द्रते ! तूं उतरून खाली,
जाहली कहाली जीवनांत !
भडके उष्णता पसरून आग,
पेटे जागोजाग वारापाणी !
अंतरांमधील पेटला ओलावा,
कसा शांत व्हावा तुझ्यावीण ?
शोषुन वाफारे पोटी साठविले —
तुवां, शांत केलें कणवेने.
आणि होतां कांही भडका अघोर,
वरमल्या थोर तुझ्या सरी.
शांत, शात केलें अमृत देऊनी,
स्वयेंच येऊनी गोंजारिले.
पेटतां ही आग अघोरी स्वार्थाची,
माया प्रत्ययाची उणावे कां ?
कोळसा जाहला जिथें जीवनाचा,
प्रभाव रत्नाचा निर्मिला तूं !
सत्त्वभाव तुझा चंद्रिकाशीतळ,
कोवळीक — बळ थिजलें कां ?
ये, ये देवते, तूं गर्जत, वर्षत,
जीवन हर्षत पालवूं दे !

१०. ऑक्टोबर ४९
विश्रामबाग, सांगली

# .४१. पाणी आलें !

[ एका निपाणी प्रांतांत अनेक वर्षांनंतर पाणी आल्यावरचे लोकांचे उद्गार ]

[ छंद : पादाकुलक

पाणी आलें ! पाणी आलें !
    गंगा झुळझुळे दारी,
पुण्याईच्या जटेंतून
    आज पाझरलें वारि !
पाणी आलें ! पाणी आले !
    आनंदाश्रू ओघळले,
आजवरीचे कीं आसूं
    गोड होऊनी वळले !
पाणी आले ! पाणीं आलें !
    ओलावली आज आस,
गरीबांच्या घरीं झाली—
    जळमोतियांची रास !
पाणी आलें ! पाणी आले !
    रुग्णा जान्हवीचें तोय,
भडकल्या कहालींत—
    शीतळ ये पाणपोय !
पाणी आलें ! पाणी आले !
    फोडा पोहरा, नरटी !

झाली कोरडी भाकर—
ओली घरटीं घरटीं !
पाणी आलें ! पाणी आलें !
आता नाही सानथोर,
राणीपरी झोपडींत—
न्हाते गरीबाची पोर.
पाणी आलें ! पाणी आलें !
स्वातंत्र्याच्या तेजासवें,
व्याकुळल्या, शोषलेल्या
जिवा येती कोंभ नवे !
पाणी आलें ! पाणी आलें !
आली घरीं कृष्णाबाई,
समृद्धीची माझ्या दारीं
आता फुलेल नवाई !

४ मे '५०
विश्रामबाग, सांगली

# .४२. ज्वालामुखी !

[ छंद : पादाकुलक

ज्वालामुखी ! उफाळसी धूमधडाका होऊनी !
आग ओकिसीं पोटींची, उरीं आवेगें फुटूनी !
राख दगड नि धूर तेजस्वी कीं तारनळे,
थरकांपवीत धरा स्फोटत हे सोसाटले !
कढलेला लाव्हारस रटरटून हा येई !
अंतरींची भावना वा तप्त वोसंडून जाई !

उकळूनी पंचप्राण फुटूनी वा वर आले,
पेटले वा पोटांतील अग्निरस बंडवाले !
धूर-दगड – राखेचा तापलेला रौद्र स्रोत,
फुलदाणी आकारानें रम्य जाई वर पोत !
गिरीकन्येच्या वा अंकीं झोपलेस्या महारुद्रा –
डिवचितां, तृतीय ही नेत्रांतील उग्र मुद्रा ?
जाळणार काय तारे आणि सारें अंतराळ ?
ळळळळ जिभलीनें भूमंडळ रानोमाळ ?

उफाळाया काय कुणीं केला तुझा घोर गुन्हा ?
आग पाखडसीं कां ही ? ज्वलंत कां होसीं पुन्हा ?
लाव्हारसाच्या या नद्या वाहतील दूरवरी !
राखेंतील धोंडेफेक भस्म सर्वांचेच करी !

अन्यायांची, जुलुमांची शिगे आली काय रास ?
भंगलास उरीं, होतां — घरीं सत्वाचाच ऱ्हास ?
उपाशी वा कुणी मेले — संपन्नांच्या सत्ताहाती ?
मुख तुझे दडपिले कुणीं घालुनी वा माती ?
स्थळी स्थळी अत्याचार, भूतदयेचा अभाव,
नाही तुला पाहवला, केला म्हणूनी उठाव ?

जाळूनिया जुनें जग, विश्व नव समतेचे,
निर्माविया आले वरी, स्रोत क्रूर ममतेचे ?
किंवा स्वार्थरत आम्हां — मृतवत पाहूनीया,
तुवा दिली नवी दृष्टी स्वतांलाच जाळूनीया ?

ज्वालामुखी ! ज्वालामुखी ! जीवनाची तुज चाड !
ध्येयदर्शित्व हे तुझे — कसें करू दृष्टीआड ?

१० ऑगस्ट '५०
[illegible]

## .४३. शिरीषाचा वासंतिक बहर !

[ जाति : अंजनी

सुंदर मधुर बहार । दरवळे,
सुंदर मधुर बहार !
अंगागांतुन सौंदर्याचा मोहरला संभार ! ॥ ध्रु. ॥

शिशिरामधले तुझे खराटे –
पाहूनि, वदलो प्रतिभा आटे !
रम्य अंतरिचे परंतु झाले पर्णफुलीं साकार !

रखरखलेली दुनिया भवती,
करपुन गेली राने गवती,
कोंभ नवे पण पालवले, जणु आंतर भावोद्गार !

तप्त वायुचीं फिरतीं पिशाचे,
नाच कृतांती वा कटकाचे,
फांद्यांमधुनी छुमछुमले पण रसाळ मृदु झंकार !

कीं सोनेरी मिळतां पाणी,
अमृत करीं वा रजत शिंपणी,
अंतर्गाभ्यामधुन उमळले पाचूचे शिणगार ?

रंगकुंचली कीं कुणि फिरवी,
रेखाचित्रें पुनरपि गिरवी,
रंगसंगती जमली, फिरतां हात कुशल हळुवार ?

परागपुष्पें हीं शुभ्रांतर,
कोमल हिरवीं अर्ध पिवळसर,
प्रणयतंतुचा वासंतिक वा नाजुक आविष्कार !

कीं प्रतिभा ही महाकवीची,
रसमय लीला ललितकलांची,
शिशिरांतुनही वसंत फुलवी अनन्य किमयागार ?

१२ मार्च ५१
विश्रामबाग, सांगली

## .४४. रातराणीच्या मृदु फुलांनों !

[ मुक्तछंद

रातराणीच्या मृदु फुलांनों !
दोन दिवसांचा तुमचा गंध,
अल्पकाळ तसा गोड सहवास,
पाहुनी, व्याकूळ हृदय होई !
सडा पडलेला भूमीवर किती –
कोमेजूनी गेला ! !

अवसेनंतर,
चंद्रकला जेव्हां वाढूं लागल्या,
चांदण्या रात्रीं,
डवरल्या या डहाळया कळयांनी,
घोस लोंबले फांदीफांदीवर,
पाकळी पाकळी उमलूं लागे,
जणूं बालकें डोळे उघडतीं,
सायंचांदण्या एकेक नभीं वा दिसूं लागतीं,
तसें फुललें हळूहळू नव –
ऐश्वर्य तुमचें जीवनांतील !

हासत डोलत वाऱ्यावरती
पिऊनी चांदण्यांतील अमृत,
तृप्त मनानें सोडीले सुगंधी –
तुम्हीं निःश्वास !

धुंद करुनी मन भारीलें –
वेधून मजला, जादूगार जसा –
मंत्र फेकूनी मुग्ध करी जन,
अनिमित्त हांसे जशीं वेधितीं बालकें गोड;
मोहि श्वासांनी मिटल्या नेत्रीं पिऊनी जीवन,
अतृप्तपणें समाधानलों !

जीवनीं तुमच्या
कोणती साठली महान् कला ?

संगीताचे स्वर आळवितां कुणी –
टिपले तुम्ही,
आणि रागदारी मूक सुवासीं –
मोडिली वाऱ्याच्या लहरीवरती ?
नमानसांतून तरी भिनले –
तुमचे सुगंध उन्मादकारी ?

नृत्यकलेंतील छुम्छूम रुम्झूम,
अभिनयांतील कोमल कटाक्ष कांचनीच्या ...,
हळूवारपणें ओढून घेतले,
आणि खालीवर डोलवीत माना –
चांदण्यांत ते निश्वासीं टाकले –
अष्ट सात्विक रसेले भाव ?

प्रमदांच्या अंतरंगांत शिरूनी
वेंचिली तुम्हीं आर्त कोवळीक,
आणि उन्माद धुंदकारी, नव –

रसरसलेली, काव्यात्म वृत्ति,
तारुण्यांतील जीवनसंगीत –
उन्मेषून जी स्वप्नसंगिनी –
स्पर्शीते आपुल्या तानेमधूनी ?

जीवन तुमचे किती अल्पकाल !
पण चांदण्याचें अमृतजीवन –
सेवूनी शांत,
अमृतजीवन देतां मजला;
आणि कोमेजूनी पुन्हा जन्मतां,
द्यायास अमृतजीवन आम्हां
परंपरेने !

जीवनांत मृत्यू येतां, हसतां;
मृत्यूंतून नवे जीवन घेऊनी,
हासतां, रमतां –
आणि रमवीता !
म्हणून माझा व्याकूळतो जीव –
सोहार्दासाठी,
आणि बसती डहाळ्यावर, चांदण्यावर
डोळे खिळूनी माझे अधीर –
जवळिकेसाठी !

१८ जून '५१
विश्रामबाग, सांगली

## .४५. निवान्त !

[ प्रियामित्र कै. माधवराव पटवर्धन यांच्या पुण्यांतील ' निवान्त ' घरास उद्देशून ]

[ सुनीत : वृत्त : शा. वि.

येथे आपण बैसुनी नवनव्या काव्यामधे रंगलों;
रात्री जागवुनी किती हितगुजें केलीं जिवाचीं नवीं,
पाहूनी घरवात सुंदर तुझी कौतूहलें हासलों,
वात्सल्याश्रु तुझे इथेच दिसले, पाहून बाळें भवीं !

विद्वद्गोष्टि इथे करीत बसलों स्नेहाळ मित्रांसवें,
केव्हा तुंबळ वाद माजवुनिया, घोरांवरे खेळलीं,
झालों आणि पळांत एक, सुहृदा ! ढाळूनिया आसवे,
बंधुत्वें रिझवूनिया शमविलीं संसारतापावली !

येथे आठवतां प्रसंग समरी, आधार वा लाभले,
गेलें अंग शहारुनी, बघुनिया रक्ताळलेलें जिणें,
आणी थोर सरस्वती परि इथे त्वत्कीर्तिचीं मंगलें,
झालें शांत 'निवान्त' सार्थ सुहृदा ! लोपून गेलीं रणे !

काळानें परि घोर अर्थ भरला नांवांत या नाकळे !
आता येथ थरारुनी, करपुनी काळीज हें जाकळे ! !

२१ जुलै ५१
विश्रामबाग, सांगली

# .४६. पायांतल्या दगडाचें सूक्त !

[ नेहमी कळसाला वंदन होतें व पायांतल्या दगडाची कोणीच कदर करीत नाही; पण अपूर्व त्याग करणाऱ्या या दगडाचेंहि कांही म्हणणें असतें हीच या कवितेची भूमिका आहे. ]

[ जाति : भूपतिवैभव

मज असे घातलें विधिनें पायतळांत,
परि हीन न गणिलें कधी, न केला घात.
मज दिली थोरवी नित पहिल्या मुजऱ्याची,
जवळीक लाभते म्हणुनी थोर करांची.

मी असे गाडलों जरी खोल अंधारीं,
घे प्रकाश दुनिया मजवर राहून सारी.
मी इथे न कंदी, चिर लावूनी ध्यान,
श्रवतसे सुमंगल मंदिरातलें गान.

" वंदिती जवाहरकळसा सारे "– वदती,
परि कळस देतसे श्रेय मला तें अंतीं.
मज म्हणे, " भाउ ! हा तुजवर सारा भार,
तुजमुळेंच मजला मिळती वंदनहार.

गातात कितीजण या या त्यागाची गाणीं,
मज ऐकाया ती मिळते थोर कहाणी.
ही 'विठ्ठल-रखुमाईची' घडते सेवा,
कां उगाच करणें वरल्यांचा मी हेवा ?

नित 'पराविया सुख सुखें'- श्रवून अभंग,
कां अतुल समाधि-सुखाच्या करुं मी भंग ?
अन् कळस नव्हे का आपुल्यांतला थोर ?
मज अमृत मिळे, त्या वरी स्पर्शतां कोर !

१३ ऑक्टोबर '५०
विश्रामबाग, सांगली

## .४७. मैत्रीचें सिंहावलोकन !

[ ' येई रम्य उषा ! उषामय पुढे रस्ता असे आपुला ' असें म्हणणारी एक व्यक्ति आपल्या जीवनांतील उत्तर विभागांत पुन्हा हें ' सिंहावलोकन ' करीत आहे. ]

[ मुनीत वृत्त : शिखरिणी

उषा आली आली म्हणुनि भरला हर्ष हृदयीं,
उषा हो स्नेहाची उजळि मज तेवून समई,
उषेच्या उल्हासें उमलुन हसे हृत्कमलिनी,
उषेच्या आनंदें भरुन दुथडी जाय तटिनी;
उषेच्या रंगाने हृदय फुललें मोहरुनियां,
उषेच्या भावानें विमल विकसे आंत दुनिया;
उषा फेकी हास्यें, मधुर नव उन्मेष सदनीं,
उषेच्या सूक्तांनीं कवळ भरिला गोड वदनीं;
उषेच्या चैतन्यें रसभरित हो जीवनतरु,
उषेच्या ऐश्वर्यें हसतमुख लागेंच डवरूं;
उषेच्या संगीतीं विलसति नव्या रागरसना,
उषा अंतर्विश्वा सुखमय करी दिव्यनयना.

कुठूनी दुर्दैवी अशुभ परि, छाया अवतरे !
तमिस्रा संध्येची मजभंवति ही घोर पसरे !!

२८ जून '५१
विश्रामबाग, सांगली

# .४८. गौळणी !

## ( एक कथानृत्य )

[ सूत्र : 'वेळू' गांवच्या पाटलानं 'कमंडलू'च्या तीरीं उत्तम कुरणं वाढवून व जनावरं संगोपून खूप दूधदुभतं तयार केलं व तें आपल्या गांवाला भरपूर पुरवून, अल्पावधींत गांव सतेज व पुष्ट केलं. या कामीं त्याची पत्नी पाटलीण व गांवांतले गवळी व गौळणी यांनी त्याला फार मदत केली. तेव्हा या विशेष कामगिरीबद्दल पाटलांना केंद्रीय सरकारानं दिल्लीहून एक खास बक्षीस पाठविलं. या बक्षिसाच्या आनंदानं ती पाटलीण नाचूं लागली. – येथ नृत्याला सुरवात होते. ]

[ पडदा उघडतो ]

पाटलीण : ( नाचत नाचत आनंदाचे हातवारे करीत प्रवेश करते )

[ चाल : आंबा पिकतो, रस गळतो ]

**"बाग फुलली !**
**फुलं हासलीं !**
**अंगणांत पखरण माझ्या जाहली !**
**चांफा फुलला !**
**दरवळला !**
**गौळवाडा सुवासानं माझा भरला !"**

( समोरच्या विंगकडे जाऊन, हाताने पालवीत )

**"या ग, सयांनो !**
**गवळणींनो !**
**चला या ग फेर धरूं, मैतरणींनो !"**

( पुनःपुन्हा 'बाग फुलली' वगैरे म्हणते )

राधा, कुंदा : ( नाचत नाचत प्रवेश करून )
"झालं तरी काय ?
गवळणीमाय,
आनंदाचं दूध कां ग उधाणून जाय !"

चंद्रा, वृंदा : ( नाचत नाचत प्रवेश करून )
"झालं काय बाई !
फुलली कां जाई ?"

चौघीजणी : ( पाटलिणीभोंवती फेर धरीत )
"हूंबारून नाचती कां सांग तुझ्या गाई ?"
( पुन:पुन्हा हीच ओळ म्हणतात )

पाटलीण : ( नाचत, आनंदानं लाजत, दांतात पदर धरून )
[ चाल : चल ग पोरी रानामधे ]
"सांगु तरी काय तुला मनांतलं ?
कानांत सांगतें ग कानांतलं !"
( 'राधा व कुंदा' यांना खुणेने जवळ बोलावून व कांही कानांत सांगून )
"नाच, बाई नाच ! आता हास बाई हास !
बहरूं दे मनींच्या ग माझ्या गुलाबास !"
( पाटलीण नाचते. सर्वजणी पायानं ठेका देतात. )

राधा, कुंदा : ( बाकीच्या मैत्रिणीकडं वळून हनुवटीबर बोट ठेवून )
"अग बाई, ऐका ग गौळणिनो,
फुलोरलं दैव हें ! नाचा सख्यांनो !"

चंद्रा, वृंदा : ( नाचत नाचत, राधाकुंदांच्याजवळ जाऊन उत्सुकतेनं )
"झालं तरी काय बाई, सांग बाई सांग !
उसटलं कसलं ग उधाण अथांग ?"

राधा, कुंदा : ( 'चंद्रा व वृंदा' यांना जवळ बोलावून व त्यांच्या कानांत सांगण्याचा अविर्भाव करून )

"दूध घातलं !

गांव पोसलं !

पाटलांना दिल्लीहून बक्षीस आलं !

पाटलांना दिल्लीहून बक्षीस आलं !"

चंद्रा, वृंदा : ( आनंदानं नाचत नाचत )

"खरं कि काय ?"

( पाटलिणीच्या पायांकडं बोट दाखवीत )

"भाग्याचे पाय !"

चौघीजणी : "गौरवुं चला तुम्हां पाटलिणबाय !"

( पुनःपुन्हा ही ओळ घोळतात )

पाटलीण : ( लाजून त्यांचा प्रतिकार करीत व दातांत पदर धरून लाजत आणि मुरकत )

"मला नको ! पाटलांचा गौरव करा,

पोचवलं दूध त्यांनी घराघरां !"

चौघीजणी : ( पाटलाच्या घराकडे तोंड करून हातांनी पालवीत )

"यावं यावं पाटील !

बांधून मंदिल !

पाटलिणमाय तुम्हां सोबत करतील !"

( दुसऱ्या विंगकडे तोंड करून हातांनीं पालवीत )

"यावं गांवकरी !

घरची स्वारी !

गौरव मांडला हा पाटलांच्या घरीं !

दूध घातलं !

गांव पोसलं !

पाटलांना दिल्लीहून बक्षीस आलं !

यावं गांवकरी !

घरची स्वारी !

गौरव मांडला हा पाटलांच्या घरीं !"

( सर्व मैत्रिणी हें म्हणत रहातात. इतक्यांत एका बाजून पाटील नाचत येऊन पाटलिणीजवळ जातात; तोंच दुसऱ्या बाजून या मैत्रिणींचे पति एका-मागून एक नाचत येतात व आपापल्या पत्नीजवळ उभे राहून जोड्या तयार करतात. मग सर्वजण 'पाटीलपाटलिण' यांस मधे उच्चासनावर बसवितात व मग सर्व जोडपीं आपल्या जोडीदाराच्या हातात हात घालून नाचत नाचत सभोंवती फेर धरतात. )

चौघीजणी : ( पतींसह फेर धरीत )

"बसा बाई बसा !

दोघंजण हसा !"

सर्वजण : "जोडीनं फुलं देऊं तुम्हां पसा पसा !"

( पुन्हा फेर धरून खालील गाणं म्हणतात )

"नंदानं चारल्या रानांत गाई,

काढीते दुभतं यशोदामाई !

भरून दूध तें चर्व्याचर्व्यांत,

पोंचवलं आम्हि बाई, घराघरांत;

ओपासलीं बाळं, गोपगोपी !

रीत बाई, आमची भारी सोपी !

वरसलं बाळसं हें घराघरांत,
दिल्लीचं बक्षीस पडलं करांत !
पाटील नि पाटलिण आमचे असे,
गवळयांत गोकुळ नांदतसे !
दूध दहीं लोणी,
तुम्हांला कोणी
पाटलावाचुन देइल कसा !
नंदच आमच्या गांवचा असा !
येईल ग आता कन्हय्या गडी,
दुधानं गांवची भरंल थडी !"

( पुनःपुन्हा म्हणतात व नाचतात )

( नंतर एकेक जोडी पुढं येत व पाटील-पाटलिणींना फुलं देत म्हणते- )

"गौरवुं या !
फुलं वाहुं या !
गाउन 'गौळणी' रुमझुमुं या !
बाई रुमझुमुं या ! बाई रुमझुमुं या !"

( 'बाई रुमझुमुं या' एवढी ओळ ठेक्यात म्हणत प्रत्येक जोडी फुलं ठेऊन विंगमधे नाचत नाचत निघून जाते. शेवटची जोडी गेल्यावर पाटील व पाटलिण उठतात व एकमेकांचे हात हातांत घेऊन- 'रुमझुमुं या ! रुमझुमुं या' !! असें म्हणत नाचत नाचत दुसऱ्या विंगकडे जातात. )

( पडदा पडतो )

१९ ऑगस्ट '५१
विश्रामबाग, सांगली

## टीपा

३ होमकुंड : १९४२ सालीं पुणें व बेळगांव या ठिकाणीं झालेल्या अत्याचारी गोळीबारांचें हें चित्र आहे.

८ विक्रम नगरीस : वररुचि = विक्रमराजाच्या दरबारांतील नवरत्नांपैकीं एक थोर कवि व वैयाकरण. हाल : गाथासप्तशतीचा कर्ता कवि.

१२ कलावंत : ही कथा मुंबईचे शिल्पकार श्री. करमरकर यांच्या शिल्पमंदिरांतील दोन भव्य चित्रांच्या सत्यकथेवरून घेतली आहे. 'रथाधःस्थळीं कृष्ण' = 'प्रतोद मग ठेविला उतरला रथाधःस्थळीं' या वामन पंडिताच्या (कीं हरिपंडिताच्या?) प्रसिद्ध ओळींतील वीररस येथे अभिप्रेत आहे.

१३ माळावरील शिरीष : सांगली विलिंग्डन कॉलेजच्या परिसरांत 'अतिथिगृहाचें' मागें एक भव्य शिरीषवृक्ष आहे. उन्हाळ्यामध्ये (मार्चमधे) याचे खराटे होतात व भर दुपारच्या सोसाट्याच्या कढत वाऱ्यांत त्याच्या शेंगा भेसुरपणाने खुळखुळत राहातात; पण लवकरच पुन्हा याला सुंदर पालवी व फुलेंही येतात. शिरीषाचें हें जीवन व १९४२ च्या चळवळीमागचे महात्माजींचें जीवन या दोन्हींच्या एकाच वेळच्या दर्शनांतून ही कविता निर्माण झालेली आहे. कुंडलिनी = [योगशास्त्र] शरीरांतील मणिपूर चक्राचे ठिकाणी सर्पाच्या आकृतीरूपानें राहणारी प्राणरूप शक्ति. पहा.—

"तव एरीकडे धनुर्धरा । आसनाचा उबारा
शक्ति करी उजगरा । कुंडलिणीए,
नागाचे पिलें । कुंकुमें न्हालें
वलण वेउनि आलें । सेजे जैसें

तैसी ते कुंडलिणी । मोटका औठे वलणी
अधोमुख सर्पिणी । निदेली असें"

[ज्ञा. अ., ६ ओ. २२१ ते २२३ ]

१४ यज्ञवीरांस औक्षण : १९४६ सालीं अनेक नामवंत भूमिगत कार्यकर्ते एकदम प्रकट झाले; त्यावेळीं हिंददेवीनें त्यांना केलेलें हें औक्षण ( ओवाळणें ) आहे.

१८ हतभागिनि गे : सुप्रसिद्ध कवि विनायक याची 'तळहातीं टेकुनी ही स्वाशिरातें बसली !' ही कविता व केशवसुताच्या 'गतशतकांचीं पापें घोरें। क्षालायाला तुमचीं रुधिरें । पाहिजेत रे, स्त्रैण न व्हा तर !' या ओळी प्रसिद्ध आहेत. १९४६ पर्यंत परकीय सत्तेमुळें हतभागिनी झालेली ही 'हतभागिनी' हतभागिनीच राहिलेली आहे हें या कवितेचें सूत्र आहे. लक्ष्मी = कॅप्टन लक्ष्मी – सुभाषचंद्राच्या 'जयहिंद' सेनेतील एक स्त्रीअंमलदार.

२४ झुंझार प्रणति : स्वातंत्र्याचा स्वीकार करतांना भारताला जी अघोर किंमत द्यावी लागली तिचें पंजाबमधील हें चित्र आहे.

२६ माझें आवडते मनोराज्य : 'सा विरहे तव दीना'– जयदेवाच्या गीतगोविंदातील एक सुंदर अष्टपदी.

२७ महात्माजींच्या समाधीवर : 'धर्मराज सार्थ पदवी झाली' = विराटाच्या दरबारांत विराटानें धर्माला फासा मारल्यावर त्याचें रक्त जमीनीवर सांडू नये, म्हणून द्रौपदीनें तें चटकन आपल्या ओंजळींत धरलें व विराटाचें राज्य शापापासून वांचविलें, ही कथा इथे अभिप्रेत आहे. हाः राम! राम !'= महात्माजींचे शेवटचे शब्द. 'कैलासलेणें' = अखंड खडकांत खोदून तयार केलेलें वेरूळचें एक अत्यंत सुंदर शिल्पकाम. 'हिमालयीं लावूं ... नीरांजन,' = 'हिमालयाचा निरांजन' म्हणण्यामधें महात्माजींचें मोठेपण सूचित करावयाचें आहे.

२९ मिणीचा खाऊ : मिणी = ( कविता २३ व २९ ) 'मृणालिनी' चें संक्षिप्त रूप; एक तीन वर्षांची बालिका.

३० स्वातंत्र्यमंदिर : तेव्हा = १८१८ सालीं; नववाणी = लोकहित-वादी, जांभेकर, न्या. रानडे, ज्योतिराव फुले, दादाभाई नवरोजी वगैरेंची प्रेरणा; सुधा = चुना; रक्त शिंपिलें ... खड्गांनीं = राणी लक्ष्माबाईचें व वासुदेव बळवतचें स्वातंत्र्ययुद्ध; आत्मार्पण = अनेक क्रांतिकारकांचें फाशीं जाणें व इतरांचा तुरुंगवास; चतुःसूत्री = 'स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण व स्वराज्य' हीं लो. टिळकांचीं चार तत्त्वें; त्रिगुणीं = 'सत्य, अहिंसा व प्रेम' हीं महात्माजींचीं तीन तत्त्वें. तिरंगी अवतार = तिरंगी झेंडा.

३३ अस्थिविसर्जन : यांत आलेले निरनिराळ्या तीर्थांचे उल्लेख म्हणजे महात्माजींच्या रक्षाविसर्जनानें पवित्र झालेलीं भारतांतील स्थानेंच होत.

३४ अंगरजाच्या : 'धन्यास्तदंगरजसा मलिनी भवन्ति' ही शाकुंतलां-तील कालिदासोक्ति पहा.

३५ चंद्रलेखेचा पाळणा : चंद्रलेखेच्या बारशाच्या दिवशीं तिची आई हा पाळणा म्हणत आहे. 'चंद्रकांत' = 'चंद्रलेखे' च्या वडिलांचें नांव.

४० देवी आर्द्रते ! : काळ्याबाजाराची भीषणता पाहून देवी आर्द्रतेची भाकलेली ही करुणा आहे.

४२ ज्वालामुखी : गतवर्षी ( १९४९ ) झालेले ज्वालामुखीचे स्फोट या कवितेला कारणीभूत झाले

४४ अनिमित्त हासें : टीप ३४ पहा.

४६ पायांतील दगडाचें सूक्त : पराविया ... सुखें = 'तुका म्हणे सुख पराविया सुखें' हा देवळांतील भजनांत म्हटला जाणारा तुकारामाचा अभंग.

४७ मैत्रीचें सिंहावलोकन : याच शीर्षकाची एक कविता माझ्या 'कांचनगंगा' संग्रहांत पा. २१ वर आहे. ती कविता लिहिल्यावर, पुन्हा २९ वर्षांनीं केलेलें हें 'सिंहावलोकन' आहे.

४८ गौळणी : गायन, नृत्य व काव्य यांच्या नाट्यमय माध्यमांतून चित्रित केलेला एक ग्रामीण प्रसंग.

# कवि गिरीश यांचीं पुस्तकें

## काव्य

१ अभागी कमल [ वैधव्यजीवनावरील खंड काव्य ]
२ कला ... [ कलाजीवनावरील खंड काव्य ]
३ आंबराई ... [ शेतकीजीवनावरील खंड काव्य ]
४ कांचनगंगा ... [ १९१३ ते १९३० स्फुट कविता ]
५ फलभार .... [ १९३० ते १९३४ स्फुट कविता ]
६ मानसमेघ ... [ १९३४ ते १९४३ स्फुट कविता ]
७ चंद्रलेखा ... [ १९४२ ते १९५१ स्फुट कविता ]

## गद्य

८ काव्यकला .... [ टीकात्मक लेखसंग्रह ]
९ मराठी नाट्यछटा [ नाट्यछटेवरील प्रबंध ]

## संकलित

१० अनिकेत [ भाषांतरित खंडकाव्य ]
११ कांचनमेघ [ कांचनगंगा, फलभार व मानसमेघ यांमधील निवडक स्फुट कविता ]

☞ मिळण्याचा पत्ता:– प्रा. शं. के. कानेटकर
'कांचन,' विश्रामबाग,
सांगली